


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिध्द केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








नवरस कथा विशेषांक




जुलै १९७० ● वर्ष २६ वे ● मूल्य २ रुपये

## श्रेयनामावली

● **डिकन्स : एक साहित्य सूर्य** एकपात्री प्रयोगांचा आद्यजनक—**रवींद्र पिंगे** ● **सुपारीनं दिली सुपारी** गिरिधरलाल व अरुणकुमार यांच्या शोधात—**ना. व्यं. देशपांडे** ● **मी स्वतः खुनी असल्यामुळे** पोलिसांकडून जोरदार तपास—**वि. ज. पेठे** ● **पराजिता** हे सर्व राजनला कळलं तर ?—**श्रीधर घैसास** ● **कथा काममंजिरीची** तिने पैज कशी जिंकली ? —**आनंद साधले** ● **शिर सलामत तो** पण त्यासाठी काळजी कशी घ्यावी ? —**रमण माळवदे** ● **भेट ...** मी आणखी आइस्क्रीम खाणार आहे—**रवींद्र पिंगे** ● **रुणुझुणुती क्षुद्रघंटिका** ज्ञानकोषातील फुलपांखरू—**सोपानदेव चौधरी** ● **मुक्ती** यापुढे धर्मराजांबरोबर राहणे अशक्य—**मंगेश कुलकर्णी** या शिवाय सन्मानपुष्पे, रंगमंच, दीपमाला, ऐसी अक्षरे रसिके ही नेहमीची वाचनीय सदरे आणि

**'सुप्रिया'—लेखक आणि छायाचित्रकार—पुरुषोत्तम बावकर**

*** राजकीय रंगमंचावरील एकेकाचे रागढंग ***

**मासिक विंग चित्रमाला**

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

टे. नं. ३५७७६५
Gram ; DALALART

संपादक—मुद्रक—प्रकाशक—मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीची किमत २ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध लेखकांची मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay-4.










अनुक्रमणिका

# सांगण्याचा उद्देश : कथा विशेषांक

आज हा विशेष कथा अंक आम्ही वाचकांच्या हाती देत आहोत. तशा कथा तर सर्वच अंकातून असतात. आणि तरीही हा विशेष कथा अंक का ? कशासाठी ? विशेषांक हवेतच म्हणून काढलेला ? अर्थात नाही. दीपावलीच्या पंचवीस वर्षात योजनाशून्य–हेतुशून्य असे काही केले नाही, घडले नाही असे आम्ही साभिमान म्हणू शकतो. कथा–विशेषांकही योजनाबद्ध आहे. जीवन हे बहुरंगी, बहुढंगी आहे, नवरसात्मक आहे. त्याचा आविष्कार साहजिकच बहुरंगी बहुढंगी असणार, असायला हवा. कथांचे बहुरंगी विश्व अखेर प्रयत्नपूर्वक शोधावे लागते. त्याला काही माणसे योजना म्हणतात. काही माणसे संपादन म्हणतात. आम्ही काहीच म्हणत नाही. प्रयत्न आमचा धर्म. आम्ही तो पाळला की नाही येवढंच आम्ही पाहणार.

प्रस्तुत अंकात प्रयत्नांची साक्ष पानोपानी मिळेल. राजकारणाच्या पार्श्वभूमीवरील अपेक्षाभंगाची तीव्र वेदना सांगणारी भेट, ठराविक चाकोरीतील त्रिकोण, चौकोनात्मक प्रेमकथेपेक्षाही भूल घालील अशी प्रेमकथा–पराजिता, पौराणिक वातावरणातील मुक्ती, रहस्यपूर्ण सत्यकथा (खरोखरच खरी), रहस्यकथा आदि मजकुराबरोबरच 'सुप्रिया' ह्या नावाची, एका मॉडेल गर्लच्या जीवनावर आधारलेली एक उत्कट, अनुभवसंपन्न व थरारक कादंबरीही ह्या अंकी सुरू होत आहे. पहिला हप्ता पुढील हप्त्यांची ओढ लावील. याशिवाय जगप्रसिद्ध कादंबरीकार चार्लस् डिकन्स याची जन्मशताब्दी नुकतीच येऊन गेली. त्याची दखल तशी कमीच घेतली गेली; पण दखल घेणारात 'दीपावली' आहे. डिकन्सवरचा लेख आगळा व आकर्षक ठरेल हा विश्वास ! !

'दीपावली' दिवाळी अंकाचे वेध सुरू झाले आहेत. दीपावली आता वयात आणि जाणीवेत आली आहे. नवे काय करता येईल–प्रसंगी पंचवीस वर्षांचा साचा मोडूनही–याचा विचार चालू आहे. अजून दोन तीन महिन्यांचे अंक भेटीस यायचे आहेत. आता पुढलाच अंक पहा की ! कवि, नाटककार, कथाकार, कादंबरीकार वि. वा. शिरवाडकर हे विचारवंतही आहेत. आजच्या संतप्त तरुणांच्या मनःस्थितीचे व विचारांचे त्यांनी केलेले विश्लेषण मौलिक ठरेल. आचार्य अत्रे गेले. वर्ष लोटलं असलं तरी 'अत्रे' ह्या विषयातला ताजेपणा कायम आहे. अत्रे कुटुंबाचे एक निकटवर्ती डॉ. म. मा. आळतेकर यांनी घडविलेले अत्रे दर्शन सुखद ठरेल. ना. यशवंतराव मोहिते हे नुसते नामदार मंत्री नाहीत. स्फोटक, धक्के देणाऱ्या विचारांचं ते जणु भांडारच. 'सहकार विधेयक' ही त्याची ताजी साक्ष ! ह्या विधेयकाबद्दल सध्या सहकार–क्षेत्री अनेक मते आणि मतभेद व्यक्त केले जात आहेत. धमाल उडाली आहे. त्याबद्दलच्या काही 'सहकारी' तज्ञांच्या मुलाखती आम्ही ऑगस्ट अंकात देत आहोत.

तेव्हा रसिक मित्रहो, थांबा, थांबा, धीर धरा, सूर सापडत आहे.

— संपादक





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०

● वर्गणी मनिऑर्डरने पाठवावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● अंक न पोचल्यास कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● जाहिरातींचा व्यवहार हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● साहित्याच्या स्वीकृतीचा निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● स्वीकृत अगर इतर साहित्य गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.





अनुक्रमणिका







अनुक्रमणिका

एक व्यक्तीकथा



# डिकन्स : एक साहित्यसूर्य

**जगातील थोर थोर साहित्यिकांच्या स्फूर्तीची गंगोत्री म्हणजे सुप्रसिद्ध ब्रिटिश लेखक चार्ल्स डिकन्स. गेल्याच महिन्यात त्याचा शंभरावा स्मृतिदिन जगभर साजरा झाला. त्या निमित्ताने श्री. रवींद्र पिंगे यांनी डिकन्सच्या जीवनचरित्राचा करून दिलेला हा धावता परिचय....**

लेखकांचे तीन ठळक प्रकार आहेत. यशस्वी, पराक्रमी आणि दिग्विजयी. भाग्यवान लेखकांपैकी वहुसंख्य लेखक हे ज्या काळात ते लेखन करीत असतात, तेव्हा अतिशय लोकप्रिय असतात. पुढच्या पिढीला मात्र त्यांच्या कर्तृत्वाची गंधवार्ताही नसते. भविष्यकाळ अशा लेखकांना त्यांच्या नावनिशाणीसह गिळून टाकतो. एच्. जी. वेल्स, वेनेट, गाल्सवर्दी, तात्यासाहेव केळकर, रे. टिळक ही नावे उदाहरणादाखल घ्यावीत. काही पराक्रमी लेखक त्यांचे लेखनकार्य चालू असताना उपेक्षेचे धनी झालेले असतात. मात्र, त्यांच्या पुढच्या पिढ्या त्यांना मानवंदना देतात; त्यांच्या लेखनाचे मोल मानतात. दिव्य भविष्यकाळ लाभलेल्या अशा सारस्वतांमध्ये शेक्सपीयर, केशवसुत, वालकवि ह्यांचा समावेश होतो. दिग्विजयी लेखक ते, की जेव्हा ते लिहीत असतात तेव्हा तर त्यांचा उदोउदो होतच असतो, पण पुढच्या पिढ्यातही त्यांच्या कर्तृत्वाचा डिंडीम गजवजत राहातो. त्यांच्या लौकिकाची पालखी त्यांच्या काळात तर जयजयकार करीत मिरवीत जातेच, पण पुढच्या पिढ्यांमधले लेखकही त्या पालखीचे भोई होण्यात धन्यता मानतात. अशा लेखनवीरांमध्ये लॉरेन्स, इलीएट, वीर सावरकर, गोविंदाग्रज, हरिभाऊ आपटे ह्यांची गणना करावी लागेल. चार्लस् डिकन्स ह्याच जातकुळीचा; पण अधिक उजवा. कारण त्याच्या कीर्तीचे क्षितीज सातासमुद्रापलीकडेही उजळलेच, पण शिवाय पृथ्वीतलावरच्या दूरदूरच्या लेखकांना डिकन्सच्या वाङ्मयात स्फूर्तीचे अखंड झुळझुळणारे झरेही सापडले. डिकन्स हा ब्रिटीश लेखक. लंडन हा त्याचा रंगमंच. आयुष्याची तीन सलग तपे त्याने धमणीत ब्रिटीश रक्त फेसाळणाऱ्या इरसाल कंपूची टर उडवली, त्यांचा दंभस्फोट केला, त्यांच्यातल्या उदात्त मानवतेचे गोडवे गाईले, त्यांच्या निखालस मूर्खपणाचे निरागस विनोदी चित्रण केले, न्यायाच्या वाजूने सतत दंड थोपटले. घर, अंगण आणि मागीलदारचे परसू ह्यात फुलणाऱ्या कौटुंबिक संस्कृतीची कृतार्थता परत परत सांगितली. हे त्याच्या हिशोवी फक्त ब्रिटीश समाजापुरतेच होते. पण ते वाङ्मय वाचून अंतःकरणे पालवली मात्र देशोदेशींच्या साहित्यसेवकाग्रणींची. रस्कीन, मॅथ्यू, अर्नोल्ड ह्या त्याच्या समकालीनांनी तर त्याची प्रज्ञा मान्य केलीच, पण त्याच्या मृत्यूनंतर शे–पाऊणशे वर्षांनी लेखन करणाऱ्या अमेरिकेच्या पर्ल बक. वेस्ट इंडीजचा.

नायपॉल, किंवा आपले पु. ल. देशपांडे–गंगाधर गाडगीळ, ह्यांच्या-पर्यंत सर्वांच्या प्रतिभा डिकन्स वाङ्मयाच्या उन्हात उजळून निघाल्या आहेत. डिकन्सचे हे ऋण नाकारणे तर दूरच राहो; उलट ते शिरोभागी धरण्यात जगातल्या सर्व लेखकांना धन्य धन्य वाटतं.

सप्तसमुद्रापलीकडच्या जगभरच्या सर्व लेखकांना प्रेरणा देणारा आणि वाचकांवर जादू करणारा डिकन्स हा एका कंगाल कारकुनाचा मुलगा. अठराशे बारा साली तो जन्मला. बाप कमालीचा कर्जबाजारी. त्यामुळे शाळेला रामराम ठोकून अवघ्या बाराव्या वर्षी दारू गाळणाऱ्या कारखान्यात डिकन्स कामगार म्हणून चिकटला. बापाने न फिटण्याइतकी कर्जे काढली. त्यापायी त्याला दोन वेळा तुरुंगात बसावं लागलं. त्यावेळच्या सैल नियमांप्रमाणे कैद्याला बायकामुलांसह तुरुंगात रहाण्यास परवानगी असे. बाप तुरुंगात गेल्याबरोबर बारा वर्षांचा डिकन्सही दिवसभर तुरुंगाबाहेर नोकरी करून रात्री थाळीपुरता बापाला कारागृहात साथ द्यायला यायचा. तुरुंगातलं जेवण उरकून लंडनच्या गल्ल्याकुच्या धुंडाळायला तो मोकळा व्हायचा. वडीलांच्या आर्थिक ओढगस्तीमुळे अभ्यासाला टाळं ठोकून आपल्याला वाटल्या धुवाव्या लागल्या ह्यांची खंत त्याला जन्मभर पुरली; पण बापाची अवहेलना त्याने कधीही केली नाही. डिकन्स पितापुत्राच्या नात्याच्या महावस्त्रात वात्सल्याच्या अनेक जरतारी झगमगताना दिसतात. लहानपणी हिंडत असताना डिकन्सला त्याचे वडील सुंदर सुंदर घरं दाखवीत म्हणत, 'अशा प्रासादांमध्ये तुला कधी रहायला मिळेल काय रे?' डिकन्सने वडिलांची ती इच्छा न बोलता चित्तात बिंबवून ठेवली आणि पुढे बरकत आल्यावर ती घरं विकत घेऊन वडीलांना दिली! काहीत तो स्वतः राहिला. डिकन्स लोकप्रिय झाल्यानंतर त्या लोकप्रियतेचा फायदा घेऊन त्याचा बाप त्याची हस्तलिखितं, स्वाक्षऱ्या, चोपड्या वगैरे बेधडक विकू लागला; डिकन्सच्या वापरातील टाक ब्रश वगैरे वस्तू स्मृतिचिन्हे म्हणून गिऱ्हाईकांच्या गळ्यात बांधू लागला; डिकन्सच्या चलतीची हमी देऊन सावकाराकडून कर्जाऊ रकमा काढीत राहिला. पितृभक्त डिकन्सने त्याबाबत तोंडून कधी ब्र तर काढला नाहीच, उलट बापाची आणि इतर कुटुंबियांची सगळी कर्जे तो फेडू लागला. सर्व नातेवाईकांची जबाबदारी डिकन्सने आपल्या शिरावर स्वेच्छेने घेतली. जन्मभर त्याने अनेक आत्मस्वकीयांना पोसले. त्यांच्यासाठी त्यांच्या सोईची घरेदारे पाहून दिली. प्रत्येकाच्या खर्चाची तरतूद करण्याचे औदार्य त्यान दाखविले.

मद्यनिर्मितीच्या कारखान्यातली नोकरी सोडून तो वकीलाकडे निरोप्या म्हणून राहिला. मग लघुलेखन शिकून बातमीदार झाला. पार्लमेंटातील वादविवादाचे त्याचे वार्तापत्र अगदी बिनचूक असे. हे बातमीपत्र लेखन चालू असतानाच विसाव्या वर्षी 'मन्थली मॅगझीन'-साठी त्याने लंडनचे दैनंदिन जीवन चितारणारे स्फुट लेखन सुरू केले. सलामीचा ललितलेखनाचा तो बार फुसका ठरला. त्यानंतर एका मासिकाकडे गोष्टीची चित्रे काढून तयार होती; पण त्या चित्रांशी सुसंगत असा मजकूर तयार नव्हता. संपादकांनी डिकन्सला गळ घातली आणि चित्रमालिकेबरहूकूम डिकन्सने गोष्ट लिहून दिली. असले तद्दन भाडोत्री काम आपणाला जमणार नाही असे त्याने संपादकाना निक्षून सांगितले; पण संपादकांना मोफत मजकूर पुरवणारा दुसरा मिट्टू मिळेना. तेव्हा त्यांनी डिकन्सला लोकप्रियता मिळविण्यासाठी तरी लेखन न सोडण्याचा सल्ला दिला. डिकन्सने बिनामोबदला लिहिले. पहिले पाच लेखांक पडले. सहाव्या प्रकरणापासून वाचक गोष्टीवर लुब्ध होऊ लागले. पुढच्या प्रकरणाची उत्कंठेने वाट पाहू लागले. ह्या लेखनातून पुढे विनोदी पुस्तक तयार झाले ते म्हणजे "पिकविक पेपर्स". हे पुस्तक म्हणजे विनोदाच्या जागतिक बाजारपेठेमधला चमत्कार समजला जातो. त्याच्या आजपर्यंत कोट्यावधी प्रती संपल्या आहेत. जगातल्या सर्व भाषांमध्ये त्याची भाषांतरे झाली. डिकन्सला मात्र त्याची लेखनावळ म्हणून अवघे चौदा पौंड मिळाले! पण ह्या पुस्तकाने त्याला लुब्ध वाचकवर्ग बहाल केला. लोकप्रियतेची चव त्याने चाटली. मग इथून पुढे टीकाकारांकडे पूर्ण दुर्लक्ष करून तो लोकांसाठी तडाखेबंद लिहू लागला. 'ऑलीव्हर ट्विस्ट', 'डेव्हीड कॉपरफिल्ड,' 'टेल ऑफ टू सिटीज', अशा अत्यंत लोकप्रिय कादंबऱ्या क्रमशः लिहिण्याचा त्याने धडाकाच लावला. 'निकोलस निकल्बी' ह्या त्याच्या कादंबरीच्या पहिल्या आवृत्तीच्या पन्नास हजार प्रती प्रसिद्धीच्या पहिल्या दिवशीच विकल्या गेल्या, ह्यावरून लोकप्रियतेचे केवढे वादळ त्याच्या सभोवार घोंघावत होते त्याची कल्पना येईल. त्याच्या पुस्तकांचे गठ्ठे घेऊन येणाऱ्या जहाजाचे स्वागत करण्यासाठी न्यूयॉर्कच्या धक्क्यावर वाचकांचे घोळके उभे असत! हे कादंबरीलेखन चालू असतानाच तीन साप्ताहिके सुद्धा त्यांचे संपादन करून तो स्वतः प्रसिद्ध करीत असे. शिवाय तो नाटकात प्रमुख भूमिका करायचा, नाटकं लिहायचा, दिग्दर्शित करायचा; कादंबरी वाचनाचा तर तो जागतिक प्रवर्तकच समजला जातो. इंग्लंड अमेरिकेत त्याने स्वतःच्या कादंबऱ्यांच्या वाचनाचे पाचशे प्रयोग केले आणि मानधन म्हणून पंचेचाळीस हजार पौंड स्वतःच्या खिशात टाकले. याशिवाय धर्मार्थ कार्यासाठी त्याने एकपात्री नकला–वाचनांचे प्रयोग करून हजारो पौंडाचा पाऊस पाडून दाखवला. चौदा पौंडाच्या मोबदल्यावर साहित्यसागरात शीड हाकारलेल्या ह्या मनस्वी लेखकाच्या गाठीला जवळजवळ एक लक्ष पौंडांची इस्टेट मरतेसमयी जमू शकली; ह्यात त्याचा सारा पराक्रम आला!

म्हातारा सिंह!



अब्दुल्लानीं पुन्हा स्वतंत्र काश्मीरची गुरकावणी दिली

दिवसाचा क्षण न् क्षण लेखनात व्यतीत करणाऱ्या डिकन्सचे आयुष्य अजिबात आळणी नव्हते. देखणेपण ही त्याला परमेश्वरी देणगीच होती. चटेरी पटेरी कपड्यांचा तो मोठा शौकीन होता. चालण्याचा आणि घोड्याच्या रपेटीचा त्याला नाद होता. वीस वीस मैल चालून आल्यावरही तो थकत नसे. अमीर उमरावांच्या घरी मेजवान्या झोडणं आणि सर्व मित्रांना खाने देणे ही त्याची हौस होती. केवळ त्यापायी त्याने हजारो पौंड खर्च करून टाकले. त्याच्या समकालीन लेखकांनी डिकन्सच्या डामडौलाबद्दल अचंबा व्यक्त केला आहे. आणि लक्ष्मी आणि सरस्वती घरी पाणी भरीत असतानाही वृत्तीने तो अत्यंत विनयशील आणि साधाच राहिला. महाराणी व्हिक्टोरियाने त्याला अनेकदा भेटीला बोलावले; पण त्याला त्याने दाद दिली नाही. शेवटी राणीचे दागदागिने बघण्याची त्याच्या मुलींना प्रबळ इच्छा झाली आणि मुलींचे मन मोडवेना म्हणून डिकन्स मुलींसह वर्तमान महाराणीकडे गेला. महाराणीच्या कृपाकटाक्षासाठी जेव्हा प्रतिष्ठित मंडळी ताटकळत बसलेली असत, त्याकाळात डिकन्स मोठ्या अनिच्छेने साध्या वेषात राजगृहात गेला आणि अर्धा तास तिच्याशी बोलला. तिने स्वतः लिहिलेले एक पुस्तक स्वाक्षरी करून डिकन्सला सप्रेम भेट दिले तेव्हा लेखनाच्या प्रांतातल्या बादशहाला आपण सुमार भेट देत आहोत ही भावना तिने लपवून ठेवली नाही. डिकन्स गेल्यावर तिने लिहून ठेवले, "माझ्याकडे हजारो जहागीरदार नि अंमलदार येऊन गेले; पण असा गोष्टीवेल्हाळ, मिष्किल, मर्मज्ञ आणि दिलखुलास मर्यादशील पुरुष केवळ तोच !"

अशा गोष्टीवेल्हाळ, मिष्किल, दिलखुलास आणि मर्मज्ञ असलेल्या पराक्रमी लेखकाने प्रेमाचे निरनिराळे अनुभव घेतले नसते तरच आश्चर्य ! साधा वार्ताहर असताना मारीया बिडनेल नावाच्या एका तरुणीने त्याला नादी लावलं आणि लग्नाचा प्रश्न निघाला तेव्हा टांग मारली. डिकन्स व्याकुळला आणि केट हॉगार्थ नावाच्या मुलीशी विवाहबद्ध झाला. घमणीत तरुणाचे उष्ण रक्त असलेल्या डिकन्सला केट फारच थंड प्रवृत्तीची वाटली. तशात डिकन्सच्या लेखनावाचनात तिला रस नव्हता. डिकन्ससारख्या सर्वत्र संचार करणाऱ्या पुरुषाचं पत्नीपद भूषविण्यासाठी आवश्यक असलेली हौस आणि चतुरबुद्धी यांचा तिच्यापाशी अभाव होता. त्यांना मुलंबाळं रग्गड झाली, पण त्याचं रहस्य असं कधीच जमलं नाही. डिकन्सबरोबर अर्धं जग फिरूनही—ती डिकन्सच्या गरजा उमजू शकली नाही. कदाचित निराशेमुळे असेल, पण ती पट्टीची मद्यपी झाली. ती संसारकृत्यही करेना. तेव्हा अखेर कंटाळून डिकन्स तिच्यापासून विभक्त झाला; तिला भरपूर पोटगी पाठवू लागला.

घरात असा विसंवाद चालू असतानाच घर बघण्यासाठी केटची सोळा वर्षांची स्वरूपसुंदर बहीण मेरी त्याच्याकडे आली. केटला दिवस गेलेले असल्यामुळे मेरी त्याला हवं–नको ते पाही. त्यातून गाढ प्रेमप्रकरण निर्माण झालं. आपला नवरा मेरीच्या प्रेमपाशात पडला आहे याची केटला जाणीव झाली होती, पण तिने ते आपल्या वहिणीला अगर पतीला कळू दिले नव्हते. एके दिवशी ती दोघे नाटकाहून परत आली आणि घरात केटच त्यांना सामोरी आली. यावेळी मात्र केटला राहवले नाही. तिने मेरीची खूपच खरडपट्टी काढली. मेरी ही अत्यंत नाजुक आणि हळव्या मनाची होती. तिची ताई तिला फडाफडा बोलली हे तिला सहन झाले नाही. केटच्या बोलण्यामुळे मेरीला भोवळ आली आणि पाच मिनिटात तिने डिकन्सच्या बाहुपाशात प्राण सोडले ! डिकन्सने तिच्या बोटातली अंगठी काढून स्वतःच्या बोटात घातली आणि ती अखेरपर्यंत बोटात ठेवली. इतकंच नव्हे तर आपल्या मृत्यूनंतर आपले दफन मेरीच्या थडग्याशेजारीच करण्याची त्याने सगळी व्यवस्थाही करून ठेवली ! मेरीच्या मृत्यूचे दुःख विसरण्यासाठी तो केटला घेऊन युरोपमध्ये विश्रांतीसाठी गेला. त्या तेवढ्या वेळात त्याने एलीनॉर नावाच्या एका विवाहित स्त्रीबरोबर प्रेमकूजन करून घेतले ! मेरीची घरातली जागा घेण्यासाठी त्याने केटची धाकटी बहीण जॉर्जी हिला घरी आणले. मेरी करायची ते सर्व जॉर्जी करू लागली आणि डिकन्सच्या आयुष्यात पुन्हा नवे प्रेमप्रकरण अंकुरले. तिला एकटीला घेऊन तो फ्रान्सला गेला. केटला त्यात काहीच गैर दिसले नाही. मात्र जगात त्याचा फार बोभाटा झाला. म्हणून डिकन्सने वैतागून अमेरिकन आणि ब्रिटीश वृत्तपत्रात मेहुणीबरोबरचे आपले संबंध निर्मळ असल्याबद्दल जाहीर पत्रे प्रसिद्ध केली ! अभिव्यक्तीचा प्रभावी प्रकार म्हणून डिकन्सने रंगभूमीवर पदार्पण केलं आणि घरी तालीम मास्तर नेमून आणि आरशासमोर अभिनयकला शिकून रंगभूमी गाजवून सोडली. ह्या प्रभावी पर्वात त्याची एलेन नावाच्या अठरा वर्षांच्या लावण्यवती अभिनेत्रीशी गाठ पडली. डिकन्सवर ती निहायत खूष झाली. त्या दोघांचे आता नवेच प्रेमप्रकरण सुरू झाले. त्या संबंधातून एलेनला एक अनौरस मुलगाही झाला. डिकन्सने तिला नवे घर बांधून दिले.

डिकन्सने आयुष्याची पंचावन्न वर्षं ओलांडली होती. जाहीर वाचनाच्या निमित्ताने अर्ध्या जगावर संचार केल्यामुळे तो गली-

'नेहरू मात्रा'



माझी घोषणे मान्य नसतील तर नवा नेता निवडा–











# उरल्या फक्त आठवणी
## डोळे ओलावणाऱ्या

आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यांना जाऊन वर्ष झालं. पण आचार्य गेले ह्यावर कधी कधी विश्वासच बसत नाही. साहित्य, समाजकारण, राजकारण वा जीवनातले समरप्रसंग समोर ठाकले की त्यांची सहजच आठवण निघते. "आचार्य आज असायला हवे होते." 'ते असते तर हे असं झालं नसतं' "त्यांनी असं होऊ दिलं नसतं" असे उद्गारं भोवती निघतात. मध्यंतरी एक 'टेप रेकॉर्ड' केलेला त्यांचा कार्यक्रम ऐकला. सजीव, ताजा, टवटवीत, जीवनाकडे निर्मळ मनाने पहायला शिकवणारा आणि आनंदमय असा कार्यक्रम ऐकल्याचं सुख लाभलं. माणसे खदखदून हसत होती. जणु तो 'सजीव' अनुभवच होता. हा ताजेपणा त्यांच्या व्यक्तित्वात होता आणि तोच ताजेपणा त्यांच्या स्मृतीतही आहे. आणि त्यामुळेच 'आचार्य गेले' यावर एखाद्या धुंद, बेसावध क्षणी अजूनही विश्वास बसत नाही. आचार्य अत्रे बरंचसं काही होते. ते नट होते, नटांचे नट होते. नाटककार होते. विनोदकार होते. रोखठोक वाणी–लेखणीचे पुढारी–पत्रकार होते. गोष्टीवेल्हाळ, रंजक, बोचऱ्या, घणाघाती, मार्मिक व वाक्‌चतुर वक्ते होते. उत्कट, मनस्वी स्वभावाचे रसीले रसिक होते, चतुरस्त्र बुद्धीचे अभ्यासक होते. त्यांनी सर्वत्र संचार केला. मित्र जोडले आणि तोडले. जीवनाचे चढ उतार पाहिले आणि तरीही हा माणूस खचला–पिचला नाही. त्याच्या वृत्तीतला ताजेपणा, शैशव, शैशवजन्म कुतुहल कधी ओसरले नाही. कविता कधी कोमेजली नाही. अत्रे म्हणजे उदंड उत्साहाचा स्रोत होता. उद्यमशीलतेचा हिमालय होता. आणि स्वतःवर प्रेम करीत करीत जीवनावर लट्टू होणारा, रसिक मनाचा, उमदा माणूस होता. ते चिडले वा वैतागले तरी माणसातल्या त्रुटींवर ! जीवनावर, निसर्गावर, सृष्टीतल्या महत्तमतेवर त्यांची अपार श्रद्धा होती, आणि म्हणूनच त्यांचे राग–लोभही क्षणिक असत. माणूस लहान असला, ठेंगू असला तरी जीवन मोठे आहे अशी ह्या महाकाय माणसाची श्रद्धा होती. आणि म्हणूनच नेहरूंना त्यांनी भरपूर शिव्याही दिल्या आणि 'सूर्यास्ता'च्या रूपाने त्यांनी त्यांची चिरस्थायी पूजाही बांधली. सावरकरांना त्यांनी अपशब्दही ऐकवले आणि त्यांची आरतीही तितक्याच उत्कटतेने त्यांनी गायिली. अत्रे यांच्या व्यक्तित्वाप्रमाणेच त्यांच्या कर्तृत्वाचा ठसाही मराठी मनावर कोरलेला आहे. राहीलही. ह्या भूमीच्या सुखदुःखाशी एकात्म झालेले अत्रे मोठे मजेशीर रसायन होते. विव्दानात विव्दान, कवीत कवी, कलाकारात कलाकार, सैनिकात सैनिक, सेनापतीत सेनापती आणि शिशूत शिशू असे अत्रे होते. म्हणूनच मराठी मनात त्यांना घरच्या माणसाचा सन्मान, त्याची माया, कृतज्ञता लाभली. या कृतज्ञतेचेच आम्ही त्यांच्या स्मृतीस अभिवादन करतो.

—संपादक

---

गात्र झाला होता. लेखनाव्यतिरिक्त एक क्षणही न दवडल्यामुळे त्याला निद्रानाशाचा विकार जडला. त्याच्या पायांमधली शक्तीही गेली. तीन मासिकांच्या संपादनाच्या सक्तीच्या कामामुळे त्याच्या मनावर असह्य दडपण आलं. तशात अनेक सामाजिक चळवळीत त्याचा हात असायचा. शिवाय त्याला अनेक संसाराच्या कटकटी मिटवाव्या लागत. त्याचा स्वतःचा, वडीलांचा, एलेनचा, वायकोचा, मुलींचा, मुलांचा, असे अनेक संसार तो एकाच वेळी वेगवेगळ्या घरांमध्ये करीत होता. वडिलांना त्याने वेगळे घर घेऊन दिले, फारकत झालेल्या केटची व्यवस्था वेगळी केली, मुलांचे संसार वेगळे करून दिले, मुलींना वेगळे घर करून दिले, एलेनला व तिच्या मुलाला वेगळा संसार मांडून दिला. ह्या सर्वांच्या संसाराची सर्व आर्थिक जबाबदारी त्याने स्वेच्छेने स्वतःवर घेऊन सर्वांची काळजी वाहिली. भरमसाट पैसा मिळवून तो अमाप खर्च करू लागला. त्याची त्याला कधीही खंत वाटली नाही; पण अखेर ह्या सर्वाचा त्याच्या प्रकृतीवर असह्य ताण पडला. एके सायंकाळी तो फारच आजारी दिसू लागला. त्याचा [illegible] त्याची मेहणी जॉर्जी पहात होती. ती घाबरून त्याला म्हणाली,

"चार्लस्, तू किती दमला आहेस रे ! चल, जरा पलंगावर निज पाहू थोडा वेळ."

डिकन्स शांतपण म्हणाला,

"आता जमिनीवरच निद्रा केलेली बरी !"

हे डिकन्सच्या तोंडचे अखेरचे शब्द !

डिकन्सच्या अंतर्यामीची इच्छा आपले दफन आपली लाडकी प्रियतमा मेरी हिच्या थडग्याशेजारीच व्हावे अशी होती. त्याने तशी व्यवस्थाही करून ठेवली होती; पण जनतेने त्याची भोळी-भाबडी इच्छा रद्द करून त्याचा खास मानसन्मान करायचे ठरवले आणि वाजतगाजत त्याच्या देहाचे दफन, जिथे राजेमहाराजे आणि प्रतिष्ठित माणसे अखेरची विश्रांती घेत पडले आहेत, त्या वेस्ट-मिन्स्टर ॲबेमध्ये मोठ्या इतमामाने केले. जगातल्या विसंगतीवर बोट ठेवण्यात जन्म घालवलेल्या विनोदी लेखकाच्या जीवनाचे अखेरचे शांतिपर्व अशा विसंवादी सुरांवरच पूर्ण व्हावे, हे एकापरीने सुसंगतच झाले

● ● ●







अनुक्रमणिका



# ज्ञान'कोषा'तील फुलपांखरू

—सोपानदेव चौधरी

आमचे जेवणखाण आटोपले होते. रात्रीच्या वेळी माझ्या घराचा दरवाजा ठोठावला गेला, कडीचा खडखडाट कानी आला. दरवाजा उघडून बघतो तो एक महापुरुष दृष्टीसमोर उभा ! काळा कोट, पँट, डोक्यावर पगडी, हातात बॅग, बगलेत छत्री 'कोण ?' म्हणून मी प्रश्न करण्याच्या अगोदरच "मी डॉक्टर श्रीधर व्यंकटेश केतकर" हे शब्द कानी आले. मी आश्चर्यचकित झालो. येण्यासंबंधी पत्र नाही, काही नाही, खरोखरच मोठा चमत्कार ! नमस्कारासाठी मी वाकणार तोच त्यांनी हातातील सामान खाली ठेवून मला सरळ केले. त्या चमत्काराचा नमस्कार होऊ दिला नाही. त्यांच्याबद्दलचा आदर अधिकच दुणावला.

डॉ. केतकर त्यावेळी कीर्तीच्या शिखरावर होते. निदान बोलबाला तरी होता. ज्ञानकोषाबरोबरच त्यांची ललितकृती 'ब्राह्मणकन्या' ही कादंबरी प्रसिद्ध होऊन ती गाजली होती. ज्ञानकोष फोडून ते फुलपाखरू बनायचे आणि ललित लेखनही करायचे. तरी पण ज्ञानकोशकार म्हणजे डॉक्टर केतकर हा शब्दार्थ रूढ झालेला होता. ते हाडाचे विद्वान आणि चरबीचे ललित लेखक होते. डॉक्टरांनी काही विनोदी कविताही लिहिलेल्या आहेत असे ऐकिवात होते. त्यातील माझ्या मुखी असलेली एक ओळ म्हणजे "मातृक्लेशन मुक्त होउनि तदा, बी. एस्. ती बैसली." (मातृक्लेशन मुक्त म्हणजे मॅट्रिक्युलेशन पास) या ज्ञानी पुरुषाला पूर्वी मी कधी पाहिले नव्हते. छायाचित्र बघण्यात आले होते, परंतु छायाचित्रावरून कायापालटी माणूस ओळखता येईलच असे सांगता येत नाही. डॉक्टर केतकरांच्या सारख्या ज्ञानी पुरुषाची भेट होणे म्हणजे एक भाग्य असे मानणारांपैकी मी एक होतो, ते भाग्य अनायासे घरी चालून आले.

मी लगेच जेवणाच्या तयारीसंबंधी सौ. लीलादेवीला (माझ्या पत्नीला) खूण केली. ते त्यांनी हेरले आणि म्हणाले, "माझे जेवण गाडीतच झालेले आहे, आता चांगला दोन तीन कप बिनसाखरेचा चहा ठेवा." तिने चांगला किटली भरून चहा तयार केला आणि त्यांच्या समोर ठेवून दिला. जवळच्या सॅकरीन गोळ्या टाकून ते चहा पीत होते. गप्पागोष्टी चालू होत्या. "आपणाला स्वराज्य मिळालेलेच आहे. हिंदुस्थान मूळचाच स्वतंत्र आहे." हे त्यांनी समजावून सांगितले. सगळेच मला आठवत नाही, परंतु त्यांची ती विधाने फार गंमतीची होती. गप्पागोष्टी करता करता किटलीभर चहा त्यांनी संपविला. रात्रीचे दोन वाजून गेले असावेत आणि मग बिछान्यावर पडताच ते घोरू लागले. सुखी माणूस !

स्वतः लिहिलेले ग्रंथ स्वतःच प्रकाशित करायचे, त्याबाबतचे सर्व व्याप स्वतः सांभाळून स्वतःच ते ग्रंथ खपवायचे, अंग मोडून काम करायचे, 'आपण हात, आपण हतियार'—असा त्यांचा खाक्या होता. एका हाती ग्रंथांनी भरलेली बॅग, दुसऱ्या हाती छत्री, मिळाला तर टांगा नाही तर बहुधा ते पायीच हिंडायचे. उन्हातान्हाची त्यांना पर्वा नसे. अशा स्थितीत हे ज्ञानकोशकार जाताना बघितले म्हणजे कुणालाही आश्चर्य वाटत नसे आणि त्यांच्या उतार वयाकडे बघून करुणाही येत असे; परंतु डॉक्टरांच्या समाधानी चेहऱ्याकडे लक्ष वेधले म्हणजे करुणादेखील शरमिंधी व्हायची. त्या काळच्या साहित्यिकांमध्ये डॉ. केतकरांचे निराळेपण स्पष्ट दिसून येत असे. डॉक्टर केतकर कसे होते ते सांगून कळायचे नाही. त्यांना ज्यांनी प्रत्यक्ष पाहिले आहे तेच ते जाणू शकतील. डॉक्टरांचा घवघवीत देह, टवटवीत चेहरा, मनमोकळा स्वभाव. अंगमोकळा पोशाख, अस्ताव्यस्ततेतही शिस्त. सगळेच काही और होते.

साध्या प्रसंगातही त्यांच्या स्वभावाचे वैशिष्ट्य दिसून येत असे. ज्ञानकोशकार सकाळी दाढी करायला बसले होते. साबणाची मिजास न बाळगता नुसते पाणी चोळून ते दाढी करीत होते. म्हणण्यापेक्षा खरडीत होते. ते दृश्य बघून मला यातना झाल्या. मी नुकतीच आणलेली एक सुंदर शेव्हिंग स्टिक त्यांच्यासमोर ठेवली. तिच्याकडे त्यांनी तुच्छतेने पाहिले आणि म्हणाले, "दाढी पाण्याने चांगली चोळली म्हणजे नरम पडते, हजामतीचीही मशागत आहे." त्यांचे ते प्रात्यक्षिक बघून माझीच बिनपाण्याने झाल्यागत वाटले. मी जे पाहिले त्यावरून त्यांच्या गरजा अगदी कमी होत्या असे दिसून आले. कार्य मोठे, गरजा कमी ! डॉक्टरांना रात्रीच्या गाडीने पुण्याला परत जायचे होते. त्या सायंकाळी टांगा करून मेन रोडला घेऊन गेले. सॅकरीन वगैरे काही सामान त्यांनी खरेदी केले. हे सर्व ठीक झाले; परंतु जरा पुढे जाताच डॉक्टरसाहेब थबकले. गावातील नामवंत भजी सम्राटाचे ते हॉटेलवजा दुकान होते. खरे सांगायचे म्हणजे मीही थबकलो. त्या भजांची चव एकदा मी अनुभवलेली होती; परंतु "भजी खायची का ?" असे या थोर व्यक्तीला कसे विचारणार ? माझा हा विचार चालू असतानाच डॉक्टरसाहेब त्या दुकानात शिरले आणि भजांचा मोठा पुडा घेऊन आले. माझ्या हातातील पिशवीत त्यांनी तो कोंबला. आम्ही टांग्यात बसलो. मी त्यांना म्हणालो "घरी तयार करायला सांगितली असती भजी !" त्यावर ते म्हणाले, "आता कुठे वेळ आहे ? हाच टांगा घरी घेऊन पुण्याला जाण्यासाठी स्टेशनचा मोटार स्टँड गाठला पाहिजे." एकंदरीत त्यांना भजी फार आवडतात असे जे ऐकले होते ते खरे तर !

[पान ८६ वर

अनुक्रमणिका

# 'ऑगस्ट' महिना हीं सीझर ऑगस्टसची स्मृती
# पणं भारतात मात्र 'ऑगस्ट' म्हणजे क्रांतीची स्मृती




## ऑगस्ट स्मृती विशेषांक

पृष्ठे ७० वर मूल्य २ रुपये

तीन विशेष लेख :

- शिवछत्रपतींच्या काळातील आसाममधील शूरवीराची कहाणी
  माधव राजवाडे
- जातीय दंगली आणि प्रांतीयवाद यांनी राष्ट्र व महाराष्ट्र हादरला आहे–एक विचारप्रक्षोभक लेख.... गोविंद तळवलकर
- सहकार· विधेयकांचा आगडोंब
  सहकार मंत्री ना. मोहिते यांच्या नव्या विधेयकाबाबत दोन 'ज्येष्ठ सहकाऱ्यां'च्या खास मुलाखती.

याशिवाय सुप्रिया कादंबरीची मनाला अस्वस्थ करणारी पुढील प्रकरणे * मुलींच्या वसतीगृहात ब्रह्मचाऱ्याचा संसार * कावळ्याच्या आवाजालाही घाबरणारी स्त्री शूर केव्हा होते * दहा युद्धवर्षांमध्ये आणखी या तिघांची भर * नुकसानभरपाईची ही कथा * सोनियाचे दिवस * इत्यादी निवडक कथा आणि

नेहमीची आवडती सदरे * मासिक व्यंगचित्रमाला



अनुक्रमणिका








चित्तप्रक्षोभक रहस्यकथा

# सुपारीनं दिली सुपारी



पोलीस आयुक्तांच्या कार्यालयातील पुरुष कर्मचारी घड्याळा-कडे नजर टाकून बसले होते. स्त्री-कर्मचारी कधीच टॉयलेट्कडे पसार झाल्या होत्या. पांचच मिनिटात कार्यालयातील वेळ संपणार होती. अन्वेषण शाखेचे (सी. आय्. डी.) इन्स्पेक्टर वाकाटकर मात्र आपल्या फिरत्या खुर्चीवर गिरक्या घेत बसले होते. जणू त्यांच्या कामाचा प्रारंभ नुकताच झाला होता! टेबलावरच्या भल्या मोठ्या ग्लासातील लस्सीचा स्वाद घेत ते मोठ्या संतोषाने त्यांच्या कार्या-लयाबाहेर उभ्या असलेल्या पोलीस लॉरीकडे पाहात होते. हमाल भराभर सुपारीच्या गोण्या उचलून गुन्हा अन्वेषण कार्यालयाच्या कोठीत आणून ठेवीत होते. ग्लासातल्या लस्सीचा शेवटचा थंड-गार घुटका घेऊन वाकाटकरांनी रुमालाने तोंड पुसले. तृप्ततेनं एक ढेकर दिली आणि पुन्हा ते सुपारीच्या गोण्यांकडे पाहू लागले. अवघ्या दोन दिवसात मुद्देमाल सापडला यावर ते खूष होते. भिकाभाई प्रभुदास नांवाच्या कंपनीने सुपारीच्या एकशेएकसष्ट गोण्या गुजरातला पाठविण्यासाठी १४-१०-६८ रोजी एम्. एच्. टी. २२७१ नंबरच्या भाडोत्री ट्रकमधून रवाना केल्या होत्या. ती सुपारी गुजरातमध्ये पोचली नव्हती. गावोगावच्या जकात नाक्या-वरून मागोवा घेता घेता ट्रक मुंबईला येऊन थडकल्याचे समजून येत होते. ट्रकचा पत्ता लागला नव्हता. सुपारीही अर्थात गडप झाली होती. शेवटी निरुपायाने भिकाभाई प्रभुदास कंपनीने मुंबई पोलीसांच्या गुन्हा अन्वेषण शाखेकडे २९-१०-१९६८ रोजी फिर्याद दिली. वाकाटकरांच्या सहकारी इन्स्पेक्टरांनी आणि इतर सहाय्यक अधिकाऱ्यांनी खूप मेहनत घेऊन माल शोधून काढला. गोविंदराम शोभराज नांवाच्या एका केमिस्टाकडे माल मिळाला. फिर्याद नोंदवून त्यावरील शाई वाळायच्या आत, गडप झालेला माल शोधून काढणे हे कर्तृत्व काही कमी नव्हते !

पण वाकाटकरांना रुखरुख लागली होती. ह्या सुपा-रीचा अपहार करणारे मुख्य आरोपी म्हणजे ट्रकचा मालक आणि त्याचा ड्रायव्हर कुलदिपसिंग हे ट्रकसहित बेपत्ता होते. गोविंदराम शोभराजकडूनच ड्रायव्हरचे नाव समजले होते. पण त्याने दिलेली माहिती फारच जुजबी होती. ड्रायव्हरबरोबर असलेला इसम कधी ट्रकचा मालक असावा असे सांगे तर कधी तो माल-काचा पुतण्या म्हणूनही सांगे म्हणे. पोलीस लॉरीतला सर्व माल कोठीत आणून ठेवल्यानंतर त्यां गोण्यांवर खुणांच्या तोंदी बरोबर

आहेत की नाहीत ते त्यांनी एकदा स्वतः पाहून घेतले आणि नंतर कागदपत्रांच्या बऱ्याच फायली चाळीत ते बसून राहिले.

दुसऱ्या दिवशी ते कार्यालयात हजर झाले ते काही नवीनच बातमी घेऊन. फिर्यादीने ट्रकचा जो नंबर दिला होता त्या नंबरचा ट्रक ठाण्याच्या आर्. टी. ओ. ऑफिसमध्ये रजिस्टर झाला होता. त्या ऑफिसमधील कागदपत्र तपासून पाहता, ट्रकचा मालक 'गिरिधरलाल असिजा' या नावाचा गृहस्थ असल्याचे समजून येत होते. ड्रायव्हर कुलदीपसिंगबरोबर असलेला इसम शीख असल्याचे गोविंदरामने सांगितले होते. अर्थात् तो मालकाचा पुतण्या असणे शक्य नव्हते.

'या गिरिधरलालला पहिल्यांदा पकडले पाहिजे. कुलदीपसिंग आणि त्याच्याबरोबरचा शीख इसम हे त्याचे हस्तक असणार आणि त्या तिघांनी मिळून या सुपारीचा अपहार करण्याचा कट योजला असणार ?' वाकाटकरांच्या डोक्यात चक्रे फिरू लागली. त्यांनी आपल्या सहकाऱ्यांशी आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांशी चर्चा केली. नेहमीच्या हुषार शिपायांना मसलतीत घेतले. वर्तमानपत्रांतून गिरिधरलाल असिजाचे नांवही झळकले. 'बेपत्ता ट्रकच्या मालकाच्या नि ड्रायव्हरच्या शोधांत मुंबई पोलीस' अशा चटकदार मथळ्याच्या बातम्या मुंबईच्या सकाळ-संध्याकाळच्या दैनिकात मिरवू लागल्या.

**....गिरिधरलालांच्या शोधात असतानाच इन्स्पेक्टर वाकाटकर यांच्यापुढे गिरिधरलालची पत्नी कृष्णा असिजा अचानक उभी राहिली....वाकाटकरांना खूपच आनंद झाला....पण तिनं आपली हकिगत सांगितली मात्र....**

एक एक दिवस जात होता. ट्रकचा पत्ता लागत नव्हता. तसाच, तिच्या मालकाचा आणि त्याच्या साथीदारांचाही. नुसती सुपारी कनवटीला लावून भागण्यासारखे नव्हते. वाकाटकर चिंताक्रांत दिसू लागले. ऑक्टोबर महिना संपत आला.

नोव्हेंबरच्या तीन तारखेस तर एक अनपेक्षित आणि गोंधळून टाकणारी घटना घडली. गुन्हा अन्वेषण शाखेच्या कार्यालयात एक मध्यमवयीन बाई येऊन इन्स्पेक्टर वाकाटकरांसमोर उभी राहिली. ती गिरिधरलाल असिजा याची पत्नी कृष्णा होती. हे समजताच वाकाटकरांना आनंद झाला. आता बेपत्ता असलेल्या गिरिधरलाल आणि त्याच्या साथीदारांना शोधून काढून त्यांना हातकडया घालणे सोपे होणार होते.

श्रीमती कृष्णा असिजा यांची हकीकत सांगून संपल्यानंतर मात्र इन्स्पेक्टर वाकाटकरांचा आनंद कोठल्या कोठे नाहीसा झाला. त्याची जागा आता आश्चर्य आणि गोंधळ यांनी घेतली. श्रीमती असिजा या दिल्लीहून आपल्या पतीच्या आणि मुलाच्या शोधार्थ आल्या होत्या. त्यांनी सांगितलेली हकीगत अशी होती—

काही वर्षांपूर्वी त्या मुले आणि गिरिधरलाल यांच्यासह

## केवळ पोलिसी चतुराई नव्हे !

मुंबई-५१
३१-३-१९७०

प्रिय श्री. दलाल,

गप्पांच्या ओघात तुम्हाला मी एकदा एका गुन्ह्याच्या खटल्याची हकीकत सांगितली. तुमच्या नेहमीच्या संवयीप्रमाणे हात पुढे करून म्हणालात 'हे चांगलं आहे. लिहून काढा...' तुमचं बोलणं मनात चांगलंच रुजलं. प्रयत्न करून बघितला. जसं जसं लिहायला गेलो, तशी गंमत वाटू लागली. एका वेगळ्या सृष्टीत वावरल्याचा अनुभव आला. धंद्यानिमित्त-पेशानिमित्त मी खटल्यांच्याच जगात वावरतोय्. पण लेखकाच्या दृष्टीतून पाहताना काही वेगळाच अनुभव आला. मानवी स्वभावांचे विविध पैलू पाहायला मिळाले. या केवळ पोलीसी चतुराईच्या कथा नाहीत. काहीसा वेगळा दृष्टिकोण ठेवून या लिहिलेल्या कथा 'दीपावली'च्या वाचकांना आवडतील असा भरवसा आहे.

कळावे,
आपला स्नेहशील,
— ना. व्यं. देशपांडे

मुंबईसच राहात. गिरिधरलाल व्यवसायाने इंजिनियर होते. त्यांना न्यू एशियन कन्स्ट्रक्शन् कंपनीमध्ये बडया पगाराची नोकरी होती. पुढे, मुलांच्या शिक्षणासाठी म्हणून श्रीमती असिजा मुलांना घेऊन आपल्या गावी म्हणजे दिल्लीला राहू लागल्या. त्यानंतर गिरिधरलाल खार येथील एव्हरग्रीन हॉटेलात एक खोली घेऊन राहू लागले. शिक्षणासाठी मुलांना घेऊन त्या दिल्लीला राहू लागल्या खऱ्या. पण त्यांचा थोरला मुलगा—अरुणकुमार याचे अभ्यासात असावे तसे लक्ष नव्हते. अभ्यासात त्याची प्रगती दिसून येत नव्हती. बिचारे गिरिधरलाल मुंबईच्या ऑफिसमध्ये बसून सदैव आपल्या थोरल्या मुलाची, त्याच्या भविष्याबद्दल काळजी करत बसत. एक दिवस त्यांच्या डोक्यात कल्पना आली. मुंबईत मालवाहतुकीचा धंदा चांगला कुरणासारखा होता. मुंबई शहर हे भारतातले मुख्य व्यापारी केंद्र. दिवस-रात्र मालाची ने-आण चालू असायची. आपल्या मुलाला एक ट्रक घेऊन दिला व त्या धंद्यातल्या खाचाखोची समजावून दिल्या तर त्याचे बस्तान बसायला हरकत नव्हती. त्याच्या जीवनाला एक दिशा मिळेल. आपलीही काळजी मिटेल. ते जो जो या कल्पनेवर विचार करू लागले तो तो ती कल्पना त्यांना अधिक रुचकर आणि फलदायी वाटू लागली. बऱ्याच विचारांती त्यांनी आपला बेत पक्का केला. आपल्या कंपनीच्या चालकांकडे थोडे पैसे कर्जाऊ मिळण्याची शक्यता होती. त्यांच्या कंपनीच्या मध्यस्थीनेच त्यांनी एक नवीन चासीस (इंजिनसह असलेल्या ट्रकचा सांगाडा) विकत घेतला. आपल्या पत्नीला पत्र पाठवून त्यांनी आपली योजना

समजावून सांगितली व अरुणकुमार यास मुंबईस पाठवून देण्याविषयी कळविले.

त्यांच्या पत्रानुसार अरुणकुमार मुंबईत येऊन दाखल झाला. गिरिधरलालनी ह्या चासीसवर हौदा (बॉडी) बांधण्यासाठी दाणाबंदर येथील कोणाच्या तरी कारखान्यात ती चासीस दिली होती. थोड्याच दिवसात हौदा बांधून झाल्यानंतर ट्रकचा वापर सुरू होणार होता. बापलेक दोघेही कारखान्यात जाऊन कामावर देखरेख करीत. थोड्याच दिवसात हौदा बांधून तयार झाला. गाडी ठाण्याच्या ट्रान्स्पोर्ट ऑफिसमध्ये रजिस्टर करून तिला एम्. एच्. टी. २२७१ हा नंबर मिळाला होता. या साऱ्या हकीकती गिरिधरलाल यांनी आपल्या पत्नीला कळविल्या होत्या. त्यांनी एक ड्रायव्हर व एक क्लीनरही नेमला होता. ट्रक रजिस्टर झाल्यानंतर त्यांना एक भाडेही तावडतोब मिळाले होते. आपल्या पहिल्याच फेरीनंतर त्यांनी आपल्या बायकोला लिहिले की हा धंदा फलदायी ठरणार आहे म्हणून. श्रीमती असिजा यांचे मन समाधानाने काठोकाठ भरून आले. ईश्वर भले करो आणि आपला मुलगा मार्गाला लागो अशी मनोमन प्रार्थना त्यांनी ईश्वरापाशी केली.

पण हे समाधान फार दिवस टिकले नाही. गिरिधरलाल यांचे पूर्वीचे पत्र आल्यानंतर दोन आठवडे उलटून गेले तरी बोटभर चिठ्ठीसुद्धा आली नव्हती. श्रीमती असिजा यांना चिंता वाटू लागली. नवीन धंद्यामुळे पत्र लिहायला फुरसत मिळाली नसेल म्हणून त्यांनी स्वतःचे समाधान करून घेतले, पण त्यानंतरही दोन आठवडे उलटून गेले तरी पत्र नाही हे पाहून श्रीमती असिजा बेचैन झाल्या. त्यांची एक मैत्रिण दिल्लीच्या टेलिफोन एक्स्चेंजमध्ये काम करीत होती. तिच्याकरवी त्यांनी खारच्या एव्हरग्रीन हॉटेलमध्ये फोनवर चौकशी केली. पण गिरिधरलालांच्या खोलीला कुलूप असून एक महिनाभर ते किंवा त्यांचा मुलगा अरुणकुमार तिकडे फिरकले नसल्याचे समजले. आता मात्र श्रीमती असिजा यांचे धाबे दणाणले. त्यांनी तडक मुंबईस जावयाचे ठरविले. त्याप्रमाणे त्या मुंबईस आल्या होत्या. मुंबईस ज्या नातेवाईकांकडे त्या उतरल्या होत्या त्यांनी मुंबईच्या वर्तमानपत्रातली बातमी श्रीमती असिजा यांना दाखविली. आपल्या नवऱ्याच्या शोधार्थ पोलीस आहेत हे समजून त्या उद्विग्न झाल्या. पोलिसांच्या लफड्यांमध्ये आपले यजमान कसे काय गुंतले गेले याचा काही त्यांना बोध होईना. त्यांना अचंबा वाटत होता. ते कसेही असो. आपण पोलिसांकडे जाऊन त्यांना ही माहिती देणे आवश्यक आहे असे त्यांना वाटून त्या इन्स्पेक्टर वाकाटकर यांना भेटायला आल्या होत्या.

श्रीमती असिजा यांची हकीकत ऐकून इन्स्पेक्टर वाकाटकर मात्र बुचकळ्यात पडले. ट्रक मालक पकडण्याच्या कामी एक मोठाच धागा सापडल्याचे त्यांना वाटले होते. पण धागा त्यांना उपयोगी नव्हता. तो रेशमी होता! चार आकड्यांचा पगार घेणारा सुशिक्षित मनुष्य अशा प्रकारच्या गुन्ह्यामध्ये गुंतला असेल हे त्यांना खरे वाटेना, पण सध्याच्या काळात कोण कसा वागेल हे काही सांगता येत नव्हते. वाकाटकरांनी श्रीमती असिजा यांचे कसेबसे समाधान करून, असिजांचा तपास करण्याचे आश्वासन देऊन परत पाठविले.

श्रीमती असिजा यांची पाठ फिरताच वाकाटकरांनी आपल्या सहकाऱ्यांसह खार येथील एव्हरग्रीन हॉटेल गाठले. हॉटेलच्या मालकाकडून काही फारशी माहिती मिळाली नव्हती. त्याने जे काही सांगितले, ते श्रीमती असिजा यांनी सांगितलेल्या हकीकतीशी सुसंगत असेच होते. गिरिधरलाल यांनी हॉटेल मालकाशी गप्पा मारता मारता आपला धंदा बरा चालला असल्याचे सांगितले होते. सप्टेंबरच्या बावीस तारखेस गिरिधरलाल आणि अरुणकुमार रात्री मुक्कामाला होते एवढी एक महत्त्वाची बातमी मात्र त्या मालकाकडून मिळाली होती. श्रीमती असिजा यांना मिळालेल्या पत्राला पुष्टिकारक अशी ती माहिती होती. वाकाटकरांनी गिरिधरलालच्या खोलीचे कुलूप तोडून सारी खोली धुंडाळली; पण त्यांचे नेहेमीचे सामान, काही कागदपत्रे याशिवाय तेथे महत्त्वाचे असे काहीच निष्पन्न झाले नाही. किंचित् निराश होऊनच ते परत फिरले. श्रीमती असिजा यांच्या हकीकतीप्रमाणे त्यांनी दाणाबंदर येथील ट्रकदुरुस्तीचा कारखाना शोधून काढला. तो चंदनसिंग याच्या मालकीचा होता. श्रीमती असिजा यांनी सांगितल्याबरहुकूम त्याचीपण हकीकत होती. मात्र ट्रकवर गिरिधरलाल असिजा यांनी सुरजितसिंग याची ड्रायव्हर आणि कर्नेलसिंग याची क्लीनर म्हणून नियुक्ती केल्याचे चंदनसिंग सांगत होता. ही दोन नवीनच नावे नवा पेच घालू बघत होती!

* * *

पैसा, सूड, बाई वा बाटली ही गुन्हेगारांची चतुःसूत्री होय. यापैकी कमीत कमी एका निमित्ताने गुन्हे तरी होतात, गुन्हेगारांच्यात भांडणे होऊन गुन्ह्याला वाचा तरी फुटते. वाकाटकरांनी आता पुढचा पवित्रा टाकायचे ठरविले. मुंबईत भिकाभाई प्रभुदास यांची सुपारी ज्या मध्यस्थांकरवी विकली गेली होती त्यांना पुन्हा हाताशी धरायचे ठरविले. प्रश्नांची बरीच सरबत्ती झाल्यानंतर मिळालेली माहिती खूपच महत्त्वाची होती. सुपारी तीस हजाराला विकण्यात आली होती. ट्रक मालक म्हणून दावा सांगणाऱ्या माणसाचे नाव होते कर्नेलसिंग. त्याचे आणि ड्रायव्हर कुलदीपसिंग यांचे सुपारीच्या पैशाच्या वाटपाबाबत भांडण झाले होते. सुपारी विकण्यास मदत करणाऱ्या चुनीलाल व सीताराम या दलालांनी मध्यस्थी करून तडजोड केली. कुलदीपसिंगाला आणखी चार हजार देण्यात आले. ट्रक कर्नेलसिंगाने वापरायचा अशी तोड झाली. आपल्या वाटणीचे पैसे घेऊन कुलदीपसिंग पंजाबात आपल्या गावी निघून गेला. कर्नेलसिंगाने एक क्लीनर नोकरीला ठेवला व त्याने मालवाहतुकीचा धंदा सुरू केला. सुपारीच्या विक्रीपैकी अद्याप काही पैसे वसूल व्हावयाचे होते आणि ते वसूल करण्यासाठी कर्नेलसिंग कधीतरी शीव कोळीवाडा येथे येऊन जाणार होता हे नक्की!







अनुक्रमणिका

सीताराम आणि चुनीलाल यांनी तर फारच महत्त्वाची माहिती दिली होती. इन्स्पेक्टर वाकाटकरांनी आपल्या विश्वासातल्या शिपायांना शीव-कोळीवाड्यावर सावध 'नजर' ठेवण्यास सांगितले. अकरा नोव्हेंबरच्या रात्री एका शिपायाने महत्त्वाची खबर आणली की दोन परके इसम चुनीलालच्या घरी उतरले आहेत. पोलिसांनी तावडतोब चुनीलालच्या घरी धाव घेतली. कर्नेलसिंग आणि त्याचा क्लीनर वजनसिंग दोघेही जाळ्यात सापडले. दोघांच्याही अंगझडत्या घेण्यात आल्या. वजनसिंगाकडे विशेष महत्त्वाचे असे काहीच मिळाले नाही. कर्नेलसिंगकडे मात्र एम्. एच्. टी. २२७१ चे कागदपत्र, एक रामपुरी चाकू, कुलदीपसिंगच्या न.वाचे एक ड्रायव्हिंग लायसेन्स, गिरिधरलाल असिजा यांचे एक चेकबुक व एक हजार चारशे अठ्ठ्याहत्तर रुपयांची रोकड मिळाली. चेकबुकावर कसले तरी तांबडे डाग होते. बहुधा ते रक्ताचेच असावेत. या साऱ्या वस्तू मूकपणे कसली तरी गढ कहाणी सांगू पाहात होत्या. गुन्हयाचा तपास करणाऱ्या साऱ्या अधिकाऱ्यांचे डोळे विस्फारले. या मिळालेल्या वस्तूंमधून कांहीतरी गुरुकिल्ली मिळणार य.त शंकाच नव्हती !

बिचाऱ्या वजनसिंगाच्या जबानीत काहीच निष्पन्न होत नव्हते. सुपारी विक्रीच्या बाबतीत त्याने कर्नेलसिंगाला थोडीफार मदत केली होती. त्यानंतर तो कर्नेलसिंगाचा क्लीनर म्हणून काम करीत होता. आपण ट्रकच्या कोठे कोठे सफरी केल्या होत्या एवढेच तो सांगू शकत होता. कर्नेलसिंग मात्र शुद्ध पाषाण होता; पण पोलीसी मात्रांचे दोन वळसे मिळताच तो ताळ्यावर आला. त्याने सांगितलेली हकीगत अंगावर शहारे आणणारी होती. आपण व आपला साथीदार सुरजितसिंग यांनी गिरिधरलाल असिजा आणि त्यांचा मुलगा अरुणकुमार यांचा थळघाटात खून करून दोघांची प्रेते घाटामधल्या घळीमध्ये फेकून दिल्याचे कबूल केले. या खुनाच्या घटनेला आता जवळजवळ पावणेदोन महिने झाले होते. आता तेथे काय मिळणार याची शंकाच होती. त्यांनी कर्नेलसिंगाच्या मागे 'गुन्ह्याची जागा दाखव'चा धोशा लावला. कर्नेलसिंगानेही जागा दाखविण्याचे स्वखुषीने मान्य केले. दुसऱ्या दिवशीच सकाळी, म्हणजे बारा नोव्हेंबरला कर्नेलसिंगाला घेऊन पोलिसांची गाडी मुंबई-आग्रा रोडवर मार्गस्थ झाली. कसारा सोडल्यानंतर गाडी थळघाट चढू लागली तशी कर्नेलसिंग आजूबाजूच्या खाणाखुणा निरखू लागला. मध्येच एक-दोन ठिकाणी तो ड्रायव्हरला थांबण्याचा इशारा करी, आजूबाजूला निरखी. आणखी मानेनेच नाही म्हणून पुढे चलण्याचा इशारा करी. पोलीस त्याच्या हालचालीवर आणि चर्येवर नजर ठेवून होते. थळघाटातील ८१/३ हा मैलाचा दगड येताच कर्नेलसिंगाने पुन्हा गाडी थांबविण्यास सांगितले. एकवार आसपासचा प्रदेश निरखल्यानंतर कर्नेलसिंगाची खात्री झाली. तो पोलीसांना म्हणाला, "हीच ती जागा. याच ठिकाणी रस्त्यावर











आपण गिरिधरलाल यांना व सुरजितसिंगाने अरुणकुमार यास सुऱ्याने भोसकून ठार केले." ज्या घळीत त्यांनी दोघांची प्रेते फेकून दिली होती ती घळ कर्नेलसिंगाने दाखविली खरी, पण रस्त्यावरून तेथे काहीच दिसत नव्हते. घळ उतरायला अवघड होती. पण झाडाझुडुपांच्या आधारे खाली जाता येणे शक्य होते. सर्वांनी आपापल्या कंबरा कसल्या आणि ते सर्वजण घळ उतरू लागले. घळीत उतरून इकडे तिकडे शोध घेताहेत तोच कर्नेलसिंगाला मानवी हाडांचे दोन सांगाडे दिसले. ते त्याने पोलिसांना दाखविले. थोड्याच अंतरावर वाळलेल्या रक्ताचे डाग असलेले पण खराब झालेले, फाटलेले कपडेही मिळाले. एक रबरी (हवाई) चपलांचा जोडही मिळाला. त्यावरही सुकलेल्या रक्ताचे डाग दसत होते. सोमनाथची लूट पाहून गझनीच्या महंमदालाही झाला नसेल इतका आनंद या मिळालेल्या वस्तू पाहून पोलिसांना झाला. या साऱ्या वस्तूंचा पंचनामा करून पोलीस मुंबईस परतले.

थळघाटाच्या घळीत मिळालेले कपडे श्रीमती असिजा यांनी आपल्या पतीचे व मुलाचे म्हणून ओळखले. बिचाऱ्या श्रीमती असिजा! पतीचा आणि मुलाचा पत्ता शोधून काढण्यासाठी त्या मुंबईस येतात काय आणि दुर्दैवाने त्यांच्यापुढे कसले ताट मांडून ठेवले होते! श्रीमती असिजा यांनी कपडे ओळखल्यामुळे गिरिधरलाल आणि अरुणकुमार यांचा 'पत्ता' आता नक्की लागला होता. आता पुढील तपास करणे जरूरीचे होते.

कर्नेलसिंगाने गुन्ह्याची कबुली दिली होती व त्याप्रमाणे गुन्ह्याची जागाही दाखविली होती. पण त्याच्याकडून साद्यंत हकीकत काढून घेणे आवश्यक होते. त्याने सांगितलेली हकीकत थोडक्यात अशी होती :—

कुलदीपसिंग या नांवावरचे जे ड्रायव्हिंग लायसेन्स कर्नेलसिंगच्या अंगझडतीत मिळालेले होते ते वास्तविक सुरजितसिंगाचे होते. त्याने ते कुलदीपसिंग या खोटया नावावर मिळविले होते. सुरजितसिंग हा एक बेकार ट्रक ड्रायव्हर. त्याचे अद्याप लग्न व्हावयाचे होते. कर्नेलसिंग हादेखील क्लीनरच्या कामाच्या शोधात होता. दोघेही नोकरीधंद्याच्या निमित्ताने दाणाबंदरजवळ दररोज एकत्र घिरटया घालीत. दाणाबंदरला चंदनसिंगच्या कारखान्यात बऱ्याच चासीस हौदे बांधून घेण्यासाठी येत. एखादी ट्रक तयार झाली की त्याच्या मालकाला अर्थातच ड्रायव्हर-क्लीनर यांची जरूरी लागे. मग चंदनसिंग अथवा अन्य कोणाच्या मध्यस्थीने अशा गरजू ड्रायव्हर-क्लीनरची वर्णी लागे. सुरजितसिंग व कर्नेलसिंग यांची दुक्कल सदैव चंदनसिंगाच्या कारखान्याजवळ असलेल्या फकीरा कुट्टीच्या झोपडीवजा हॉटेलसमोर चहा पीत बसलेली असे. या दुक्कलीची महत्त्वाकांक्षा केवळ ड्रायव्हर-क्लीनर बनण्याची नव्हती! काय मिळणार होते त्यांना एवढे अहोरात्र खपून! शंभर-दीडशे रुपयांना काय चाटायचे होते? रक्कम कशी घसघशीत हातात यावयास पाहिजे होती. ट्रकमालकाला मिळणाऱ्या रकमेसारखी.

ते दोघेही रिकामटेकडे-अशाच वल्गना करीत गप्पा छाटीत बसत. एकदा ते दोघेही नित्याप्रमाणे चहा पीत बसले होते. इतक्यात तेथे दिलीपसिंग हा आपली ट्रक दुरुस्त करण्यास कारखान्यात आला होता. या दुक्कलीला पाहून त्यानेही तेथेच बैठक मारली. हवापाण्याच्या गप्पा झाल्यानंतर एकमेकांच्या खुशालीची बातचीत झाली.

"कसली आहे खुशाली? आम्ही बेकार माशा मारीत बसलो आहोत. इथं!" सुरजितसिंग गवताची काडी चघळत बोलला.

"साले ट्रकवाले जोरात आहेत बघ! आपणही एक ट्रक घेतला पाहिजे!" कर्नेलसिंग.

"ट्रक विकत घ्यायला काय तुझ्या दाढीचे केस मोजणार आहेस?" सुरजितसिंग.

कर्नेलसिंगच्या राकट चेहेऱ्यावर किंचित् छद्मी हास्य उमटले. कुठेतरी दूरवर नजर टाकीत कर्नेलसिंग म्हणाला: "साला कोणतरी बकरा मिळाला पाहिजे....नवा....अनजाना...कुठेतरी आडरस्त्याला किंवा घाटामध्ये मुंडी मुरगाळून त्याचा ट्रक घेतला पाहिजे. नाही तरी दुसरा काय उपाय आहे?"

सुरजितसिंग त्याचे उद्गार ऐकून गप्प बसला. त्याच्या मनात कर्नेलसिंगचे ते शब्द संथ पाण्यात टाकलेल्या खड्यासारखे विचार-










तरंग निर्माण करू लागले. . किंचित् अनवधान.नेच त्याने संमतिदर्शक मान हलवली. दिलीपसिंग विस्फारित नेत्रांनी त्यांच्याकडे पाहातच राहिला. चहाचा रिकामा कप खाली ठेवून आपल्या दाढीमिशा पुसत तो म्हणाला, "बावांनो असल्या वाकड्या मार्गाने जाऊ नका ! श्रमाने पैसा मिळवाल तोच तुम्हाला पचेल. गुरु प्रसन्न झाला तर तुम्हाला काही कमी पडू देणार नाही. वाहे गुरु. बराय्. जातो मी. सत् श्री अकाल."

दिलीपसिंगाचे ते उद्‌गार निसटत्या वाऱ्यासारखे निष्प्रभ ठरले. तो दूरवर गेल्याचे पाहून सुरजितसिंग म्हणाला : "कर्नेल. . तुझा विचार तर नामी आहे बोवा! बघ. बघ.. कोणी बकरा मिळतो आहे का ते !"

त्या दोघांच्या अखंड चकरा सुरू झाल्या. एक दिवस कर्नेलसिंगाला एक नवी कोरी चासीस चंदनसिंगच्या कारखान्यात आलेली दिसली. ही बातमी त्याने सुरजितला दिली. दोघांनीही बारकाईने चौकशी चालविली. गिरिधरलाल असिजा हा आपणाला हवा तस्सा बकरा आहे,' हे त्यांना कळून चुकले. गिरिधरलाल आणि त्यांचा कोवळा पोरगा अरुणकुमार हे दोघेही ट्रकच्या कामाची देखरेख करण्यासाठी कारखान्यात येत असल्याचे पाहिले. दोघांनीही कान आणि नजर तीक्ष्ण केली. हौदा बांधण्याचे काम पुरे होत आले होते. ते पाहताच सुरजितने चंदनसिंगकडे या ट्रकवर काम मिळवून देण्याचा लकडा लावला. सुरजित बरेच दिवस बेकार असल्याचे चंदनसिंगाला माहीत होते. त्याने सुरजितला नोकरी लावून देण्याचे मान्य केले. एके दिवशी चंदनसिंगने गिरिधरलालकडे सुरजितची शिफारस केली. गिरिधरलालना ड्रायव्हर पाहिजेच होता. त्यात चंदनसिंगसारख्या माहितगाराने सुरजितची शिफारस केलेली. कुठे उगीच ड्रायव्हरची शोधाशोध करायची ? गिरिधरलालनी सुरजितला ड्रायव्हर म्हणून नेमायचे ठरविले.

ट्रकचा हौदा बांधून झाल्यानंतर सुरजितनेच तो ट्रक कारखान्याबाहेर काढला. आता ठाण्याच्या आर्. टी. ओ.च्या ऑफिसमध्ये जाऊन ट्रक रजिस्टर करावयाचा होता. टॅक्स भरावयाचा होता. नंबर प्लेटस् लावायच्या होत्या. सुरजितसिंगाने या सर्व गोष्टी झटपट केल्या. एम्. एच्. टी. २२७१ एकदाचा धंद्यासाठी तयार झाला. गिरिधरलालनी चांगल्या मुहुर्तावर गाडी खरीदली होती वाटते. त्यांना गिऱ्हाईकही तावडतोब मिळाले. नागपूर गुडस् ट्रान्स्पोर्ट कंपनीचा कोही माल नागपूरला पोचता करावयाचा होता. त्यांनी सुरजितसिंगाला गाडी भरण्यासाठी नागपूर गुडस् ट्रान्स्पोर्ट ऑफिसात जायला सांगितले.

"पण शेठ, आपल्या ट्रकवर एखादा हुषार क्लीनर पाहिजे. कर्नेलसिंग नावाचा एक क्लीनर सध्या रिकामा आहे. त्याला विचारू का ?"

"नको नको. आपल्याला सध्या क्लीनरची काही जरूरी नाही. माझा मुलगा अरुणकुमार आहे ना ! तोच ते काम सध्या बघेल. या पहिल्या ट्रिपला तर आम्ही दोघंही जातीनंच येणार आहोत.

सुरजितसिंग हिरमुसला झाला. तो काही बोलला नाही. निमूटपणे तो गाडी भरण्यासाठी निघून गेला. कर्नेलसिंग हात चोळीत बसला. आणखी थोडे दिवस वाट पाहणे भाग होते.

गाडीत माल भरून झाला. अठरा सप्टेंबरला गिरिधरलाल आणि अरुणकुमार दोघही सुरजितसिंगच्या शेजारी बसून आपल्या ट्रकमधून नागपुरास जाण्यास निघाले. तेथे माल पोचता करून ते सर्वजण बावीस सप्टेंबरला मुंबईस परतले. दुपारी ट्रकचे तेल पाणी पाहाण्यास सुरजितसिंगला सांगून बापलेक खारच्या एव्हरग्रीन हॉटेलात परतले. त्याच रात्री गिरिधरलाल यांनी आपल्या पत्नीस पत्र लिहून आपल्या पहिल्या ट्रीपची हकीकत कळविली. आपल्या नव्या धंद्यातील स्वप्ने फुलवीत ते दोघेही स्वस्थचित्ताने झोपी गेले.

दुसऱ्या दिवशी सकाळीच त्यांना दुसरे भाडे मिळत असल्याची बातमी लागली. ते तावडतोब चंदनसिंगच्या कारखान्याकडे गेले. सुरजितसिंग अद्याप आला नव्हता. ट्रकही दिसत नव्हता. चौकशी करता समजले की सुरजितसिंगचा बाप पंजाबमधून भेटायला आला असल्याने सुरजित ट्रकसहितच विक्रोळीला आपल्या घरी गेला होता. गिरिधरलालना फार वेळ वाट पाहावी लागली नाही थोड्याच वेळात सुरजित ट्रक घेऊन हजर झाला. त्यांनी त्याला ताबडतोब नव्या भाड्याची हकीकत सांगितली. सुरजितसिंग तेथे येण्यापूर्वीच कर्नेलसिंग हजर होता. त्याने गिरिधरलालांच्याकडे पुन्हा नोकरीची याचना केली. पहिल्यांदा गिरिधरलालांनी त्याला झिडकारून टाकले, पण सुरजितसिंग आल्यानंतर त्यानेही कर्नेल-

कशी या त्यजू (सत्ता) पदाला !




'देशाला माझी जरूरी आहे--राजकारणातून मी निवृत्त होणार नाही.



अनुक्रमणिका

सिंगची पुन्हा शिफारस केली. नागपूरच्या ट्रीपचा अनुभव गिरिधरलालना आलाच होता. मोठ्ठे जिकीरीचे आणि कष्टाचे काम होते ते. अरुणकुमार अद्यापी अननुभवी होता. एखादा क्लीनर ठेवला तर काय बिघडले ? असा विचार गिरिधरलाल यांच्या मनात आला. त्यांनी कर्नेलसिंगला क्लीनर म्हणून नेमायचे कबूल केले. त्या दोघांचाही आनंद गगनात मावेना. सुरजितसिंगाला जुजबी सूचना देऊन प्रवासाची तयारी करण्यासाठी गिरिधरलाल अरुणकुमारसह हॉटेलात परतले.

त्यांची पाठ वळताच कर्नेलसिंगाने सुरजितच्या हातावर आनंदाने टाळी दिली.

"कर्नेलसिंग, आता आपल्या कामाला लागलं पाहिजे. मला सल्फेटची पोती भरण्यासाठी डॉक्सवर गेलं पाहिजे. आपण तिथं जाऊ. ट्रकवर माल चढवीपर्यंत तू दोन धारदार सुरे विकत घेऊन ये."

डॉक्समध्ये ट्रक भरण्याचे सुरू होताच सुरजितसिंगने कर्नेलच्या हातात दहा रुपयांची नोट ठेवली आणि त्यास पिटाळले. कर्नेल टॅक्सी घेऊन निघाला तो थेट मेंडीबाजारात. अब्दुल रज्झाक अब्दुल गफूर याचे चाकू-सुऱ्यांचे छोटेसे दुकान होते. कर्नेलसिंगाने दोन धारदार सुरे निवडले आणि ते घेऊन तो परत डॉक्समध्ये आला. मालासंबंधीचे सर्व कागदपत्र तयार करून घेतल्यानंतर ते दोघेही दाणाबंदरला आले तेव्हा माध्यान्ह उलटून गेली होती. दाणाबंदरला गिरिधरलाल वाट पहातच होते. त्यांच्याबरोबर अरुणकुमार नव्हता.

"काय ? छोटे मालक येणार नाहीत ?" सुरजितने विचारले.

"वा! वा! न येऊन कसा राहील ? त्याला थेट माटुंग्याला यायला सांगितले आहे. आपण जाता जाता त्याला वाटेत पिकअप् करू."

दुपारी चारच्या सुमारास ते सर्वजण निघाले. वाटेत माटुंग्याला अरुणकुमार वाट पाहात उभा होताच. त्याला घेतले. साडेचारच्या सुमारास ट्रक अकोला जिल्ह्यातील कलमेश्वर येथे जाण्यासाठी मुंबईबाहेर निघाली.

वाटेत ठाण्याला जोगिंदरसिंगाच्या पेट्रोलपंपावर डिझेल घेण्यासाठी गाडी थांबली. जोगिंदरसिंग गिरिधरलालच्या ओळखीचा होता. डिझेल घेता घेता गिरिधरलालनी जोगिंदरसिंगशी गप्पागोष्टी केल्या. डिझेल वगैरेचे बिल एकशेएक रुपये बारा पैसे झाले होते. आपल्याजवळचे चेकबुक काढून गिरिधरलालनी एकशेएक रुपये बारा पैशांचा चेक फाडून दिला आणि ते पुन्हा मार्गस्थ झाले.

ही सर्व मंडळी भिवंडीला आली तेव्हा संध्याकाळ होऊन गेली होती. रात्रीच्या भोजनाची सोय पाहावयाची होती. भिवंडीला हंससिंग हकमसिंगचे हॉटेल गिरिधरलालना ठाऊक होते. त्याच्या हॉटेलात जाऊन बापलेकांनी खीर खाल्ली. सुरजित व कर्नेलसिंगही जेवण आटोपून आले. हंससिंगाशी गप्पा मारता मारता आपण नवा ट्रक घेतल्याचे त्याने सांगितले व आता भाडे घेऊन नागपूरच्या बाजूला चाललो असल्याची माहिती दिली. त्यानंतर ट्रक पुन्हा मार्गस्थ झाला. कसाऱ्यानंतर थळघाटात काय घडले याची हकीगत कर्नेलसिंगने पूर्वी सांगितलीच आहे.

कर्नेलसिंगला कोठडीत परत नेल्यानंतर वाकाटकर विचार करू लागले. 'कर्नेलसिंगची हकीकत खरी असेल काय ?' त्याने सांगितलेल्या हकीकतीप्रमाणे साक्षीदारांचा पुरावा मांडायला हवा. पोलीसांपुढे दिलेल्या कबुलीजबाबाचा कोर्टामध्ये पुरावा म्हणून काडीमात्र उपयोग नव्हता. आरोपीने सांगितलेली हकीकत नेहमीच खरी असते असे नाही. पुष्कळदा निर्ढावलेले गुन्हेगार मुद्दामच खोटी हकीकत रचून सांगतात. त्यामुळे गुन्ह्याच्या तपासात गफलत होते. कर्नेलसिंगाच्या बोटाचे ठसे फिंगरप्रिंट ब्यूरोकडून तपासून आले होते. कर्नेलसिंगाचा 'गतेतिहास' जरी मिळून आला नव्हता तरी त्याच्या हकीकतीचा पडताळा करून पाहिल्याशिवाय काही खरे नव्हते. वाकाटकरांनी आपले सहाय्यक दळवी यांना बोलावले. कर्नेलसिंगच्या हकीकतीत आलेल्या सर्व व्यक्तींना शोधून काढून त्यांच्या जबान्या घेण्यास त्यांनी दळवींना सांगितले. दोनचार दिवसातच दळवींनी चंदनसिंग, दिलीपसिंग, फकीराकुट्टी, मेंडीबाजारातला सुरेवाला अब्दुल रज्झाक, ठाण्याचा जोगिंदरसिंग, भिवंडीचा हंससिंग इत्यादि लोकांच्या जबान्या घेतल्या. कर्नेलसिंगाने सांगितलेली हकीकत या लोकांच्या जबान्यांवरून तंतोतंत जुळत होती. आता सुरजितला पकडणे आवश्यक होते. त्याचा पत्ता मिळालाच होता. वाकाटकरांनी आणखी एका अधिकाऱ्याला पंजाबकडे पिटाळले.

सुरजितसिंग हरयाणा राज्याच्या हिस्सार जिल्ह्यातील मंडी डबवाली पोलीस ठाण्याच्या क्षेत्रात राहात होता. त्याला एकवीस नोव्हेंबर रोजी अटक करण्यात आली व पोलीस त्याला सत्तावीस नोव्हेंबरला मुंबईस घेऊन आले. त्यानेही कर्नेलसिंगाप्रमाणेच जबाब दिला. धुळीत सापडलेल्या रबरी वहाणा आपल्याच असल्याचे कबूल केले. त्या वहाणा त्याच्या पायाला फिट् बसत होत्या. अरुणकुमारला भोसकण्यासाठी वापरलेला सुरा त्याने थळघाटातच फेकून दिल्याचे त्याने सांगितले. शक्य झाल्यास ती जागाही दाखविण्याचे त्याने मान्य केले. त्याच्या गावी, त्याच्या घरी घेण्यात आलेल्या झडतीत पाच हजार रुपयांची रोकड मिळाली होती. तीही जप्त करण्यात आली.

एक डिसेंबर एकोणीसशे अडुसष्ट रोजी सुरजितला घेऊन पोलीस पुन: थळघाटात गेले. गुन्ह्याच्या जागेपासून काही फर्लांगभरच्या अंतरावरच सुरजितसिंगने गाडी थांबवण्यास सांगितली. थोडीशी शोधाशोध करून एका झुडपामागे पडलेला सुरा सुरजितने काढून दिला. तो बराच गंजला होता. पोलीसांनी पंचनामा करून तो जप्त केला. सुरेवाला अब्दुल रज्झाकने तो सुरा ओळखला.

( पृष्ठ ३८ वर पहा )







अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



मॉडेल म्हणून काम करणाऱ्या एका प्रवाहपतिता सौंदर्यवतीच्या जीवनात घडलेल्या विविध घटनांची अगदी उघड शब्दात कथन केलेली ही कहाणी....



सोळा वर्षाची असताना मी किती सुंदर आणि मोहक दिसत असे हे सांगूनसुद्धा खरं वाटणार नाही. हनुवटीजवळ निमुळता होत गेलेला लांबटगोल चेहरा, काळेशार टपोरे तजेल डोळे, रुंद पापण्या, कपाळातून उचल-लेलं सरळ नाक. ओठातून डोकावणाऱ्या कुंदकळ्या, नितंबापर्यंत लोंबणारे रेशमी केस. मी अमक्यासारखी दिसते, तमक्या-सारखी दिसते असं आई नेहमी म्हणायची; पण त्या वेळच्या एका प्रसिद्ध नटीसारखी मी दिसते असं मला सारखं वाटे.

माझ्या सुंदर चेहऱ्यापेक्षा माझं शरीर अधिक सुंदर आहे असं माझी आई नेहमी म्हणे. माझ्या अंगोपांगाची स्त्री साऱ्या मुंबई शहरात मिळणार नाही असं तिचं प्रामाणिक मत होतं. त्या दिवसात मी माझ्या शरीराविषयी निष्काळजी असे. सुंदर चेहरा हेच सौंदर्याचे खरे लक्षण आहे असं मला वाटे. पण मी त्यावेळी चुकत होते आणि माझी आईच बरोबर होती हे आता मला पटलंय.

माझे पाय सरळ आहेत. त्यांवर जरासुद्धा लव नाही. काही भाग गोलाकार आहे. पाठ रुंद, कंबर लवचिक आणि बारीक आहे. खांदे भारदस्त आहेत. माझं पोट जरा मोठं आहे. त्यामुळे बेंबी बाहेर दिसत नाही. आई म्हणते हे एक सौंदर्याचं लक्षण आहे. कारण स्त्रीचं पोट मोठंच असायला

अनुक्रमणिका







हवं. आजच्या फॅशनप्रमाणे पाठीला लागलेलं नसावं. माझ्या स्तनांची वाढ व्यवस्थित झालेली असून ते घट्ट आणि लवचिक आहेत. त्यामुळे मला पॅडिंग असलेले ब्रा केव्हाच वापरायला लागत नाही.

माझे स्तन प्रमाणाहून मोठे झालेले आहेत अशी भुणभूण मी आईच्या मागे लावली तेव्हा आई म्हणाली होती, आजच्या स्त्रियांना स्तनच नसतात. त्यामुळे त्यांना कृत्रिम स्तनांच्या मागे धावावं लागतं. भरदार वक्ष असणं हे सौंदर्याचं लक्षण आहे. पुरुषांना आकर्षित करायला अशीच भरदार स्तनं असायला हवीत. मी जेव्हा नग्न होत असे तेव्हा माझे सारे अवयव प्रमाणबद्ध आहेत याची मला खात्री होई. पण कपडे घातल्यावर मी अगदीच किरकोळ वाटे. हे असं कां याचं मला नेहमीच कोडं पडे. माझ्या अवयवांची वाढ प्रमाणबद्ध झाल्यामुळेच हा फरक जाणवतो असं, प्रथम मी ज्या चित्रकारापुढं मॉडेल म्हणून उभी राहिले होते तो म्हणाला होता.

लग्नाआधी माझी आई मॉडेलचा धंदा करत असे. एक दिवस एका चित्रकाराने माझ्या आईकडे काही कपडे शिवायला दिले. त्याची ओळख झाली. आणि आईच्या मनात मी मॉडेलिंग करावं असं आलं. तिनं मला त्या चित्रकारापुढे पोझ घ्यायला सांगितलं. मी एकटी जायला कबूल असूनसुद्धा आई माझ्याबरोबर आली. त्या चित्रकारासमोर तिने माझे कपडे उतरवले. एका पुरुषासमोर कपडे उतरविण्याची माझी ती पहिलीच वेळ होती. आईने मला चित्रकारासमोर उभं केलं आणि त्याला सांगू लागली, "हिच्या उरोजांकडे पहा. हिचा कटीभाग किती छान आहे. हिचे पृष्ठ वय किती निमुळते आहेत. हिच्यासारखे उरोज, कटीभाग आणि पाय असलेली स्त्री तुला कुठं सापडणार ? एखाद्या म्हैशीला खपवताना तिचा मालक इतकं मागं लागणार नाही. आईला माझ्या सौंदर्याचा गर्व होता. अर्थात माझ्या सौंदर्याचं सारं श्रेय तिलाच दिलं पाहिजे. तो चित्रकार मध्यम वयाचा होता. अंगानं मजबूत होता. हसतमुख होता. पहिला प्रसंग सोडल्यास नंतर त्याच्यापुढे कपडे उतरवायला मला लाज वाटली नाही. कारण चित्रकाराची मर्यादा सोडून तो माझ्या पुढे केव्हाच वागला नाही.

"माझ्या मुलीला किती पैसे देणार आहेस ?"

चित्रकाराने माझ्यावरची नजर न ढळवता एक आकडा सांगितला.

आईने घुश्श्याने माझ्या अंगावर कपडे फेकले, "चल ऊठ प्रिया." आई म्हणाली.

"इतकं रागवायला काय झालं ?"

"काय झालं म्हणून विचारतोस ? तुझ्यासारखे छपन्न चित्रकार आहेत या

## पुरुषोत्तम बावकर

मुंबईत. तुला काय वाटलं, पांच रुपयात अंग उघडं करणारी ऑपेरा हाऊसची वेश्या आहे माझी मुलगी ? "आईने ओरडून त्याचा स्टुडिओ डोक्यावर घेतला. आईच्या मनासारखं झालं नाही की ती अशीच वागते.

चित्रकार गालातल्या गालात हसत होता. शेवटी तिला किती पैसे हवेत म्हणून त्याने विचारलं, पण ती सरळ बोलायलाच तयार होईना. शेवटी एकदाची बोलणी झाली. आई मागत होती त्याहून त्याने थोडे पैसे कमी द्यायचे ठरवले. टेबलाचा खण उघडून त्याने ते माझ्या आईच्या हातावर ठेवले तेव्हा कुठे तिचा चेहरा उजळला. तिने मला दोन कानगोष्टी सांगितल्या आणि ती निघून गेली.

आई निघून जाताच चित्रकाराने दरवाजा गच्च लावून घेतला.

"तुझी आई नेहमी अशीच ओरडते ?"

"तिचं माझ्यावर फार प्रेम आहे."

"तुझ्यापेक्षा तिचं पैशावरच जास्त प्रेम आहे."

"मुळीच नाही. तिचं माझ्यावरच प्रेम आहे. पण मी गरिबीत जन्माला आले म्हणून तिला फार वाईट वाटतं." मी त्याला माझ्या घरची परिस्थिती समजाऊन सांगितली.

माझं सिटींग संपल्यावर मी आईला मिल्कबारमध्ये जाऊन भेटले. ती माझी वाट पहात बसली होती. तिनं मला घडलेलं सारं विचारलं. "प्रिया ह्या चित्रकारापासून सावध रहा. ते बोलायला गोड असतात. पण पैशाने कफल्लक त्यांच्या जाळ्यात कधी सापडू नकोस. जेवढा फायदा करुन घेता येईल तितका घेऊन बाजूला व्हायचं. तुझ्या नसल्या नजरेला फार किंमत आहे हे ध्यानात ठेव.

इतक्या निश्चयात्मक रीतीने माझी आई माझ्याशी केव्हाच बोलली नव्हती.

"काय म्हणायचंय तुला मला समजलं नाही."

"तुला कोणातरी पैसेवाल्या माणसावर नजर ठेवायला हवी."

"मला नाही जमायचं तें."

"सध्या हा मॉडेलचा धंदा ठीक आहे. पुढं मागं पाहू. यातूनही काही मार्ग सापडेल." ती माझ्याकडे पहात म्हणाली.

मी काहीच बोलले नाही.

त्यानंतर मी अनेक चित्रकारांपुढे सिटींग केलं. मला आता माझ्या सौंदर्याची किंमत कळून चुकली होती. माझी नजरभेट व्हावी म्हणून अनेक जण स्टुडिओबाहेर माझी वाट पहात बसत. मी माझ्या एका मादक दृष्टीक्षेपात किती जणांना तरी घायाळ करू शकत होते. माझी आर्थिक परिस्थिती सुधारायला माझ्या सौंदर्याचा उपयोग झाला असता.

पण मला त्यावेळी लग्न करुन मुलाबाळांच्या सहवासात रहावं असं वाटे. मी मिळवी ते सारे पैसे आईच्या स्वाधीन करी. जेव्हा मला काम नसे तेव्हा घरीच राही. आईला कपडे शिवायला मदत करी. माझे बाबा वारल्यानंतर उदरनिर्वाहाचा आमचा हाच मार्ग होता. माझे वडील रेल्वेत नोकरीला होते. नाना चौक भागात आम्ही एका चाळीतील छोट्याशा तीन खोल्यांच्या ब्लॉकवजा जागेत रहात असू. बाबा गेल्यावर ते जे काही आमच्यासाठी सोडून गेले

अनुक्रमणिका




ती ही जागा. त्या जागेमुळे निदान राहण्याची तरी पंचाईत नव्हती. बाबा मेल्यानंतर रेल्वेकडून जे काही पैसे मिळाले होते ते केव्हाच संपले होते. त्यामुळे आईला काम केल्याशिवाय गत्यंतरच नव्हते.

मला लग्न करावं असं वाटत होतं. मुलंबाळं व्हावी, नवऱ्याशी एकनिष्ठतेने वागावे, सुखी ठेवावं, असं सारखं माझ्या मनात येई; पण आईने माझ्या भविष्यकाळाची योजना पक्की करून टाकली होती. माझ्या मनातल्या गुपिताहून ती वेगळी होती. मी लग्न करून कौटुंबिक आयुष्य उपभोगावं असं तिला केव्हाच वाटत नव्हतं. माझ्या सौंदर्याच्या साहाय्याने खूप पैसे मिळवण्याची तिची योजना होती. आम्ही गरीब होतो आणि माझे सौंदर्य हेच आईचे भांडवल होते.

तिच्या योजनेविषयी मला हळूहळू कल्पना येऊ लागली; पण मी मात्र आईला काहीच विचारलं नाही. माझ्यामुळेच तिला हे गरीबीचे दिवस आले होते, असं मला तिने खूप वेळा सुनावलं होतं. माझा जन्म हा एक अपघात होता. माझा जन्म रोखायचा प्रयत्न आईने केला होता, तरी तिला यश आलं नाही. तेव्हा तिने माझ्या वडिलांशी नाईलाजाने लग्न केले. माझ्यामुळेच तिला ही स्थिती आली, असं जेव्हा ती म्हणते तेव्हा मला फार वाईट वाटतं. मी जर जन्माला आले नसते तर माझ्या आईने माझ्या बाबांशी केव्हाच लग्न केलं नसतं. आणि ती दुःखात पडली नसती. तेव्हा



आपल्या मुलीनेही लग्नाच्या फंदात पडू नये अशी तिची इच्छा होती ते खोटं नव्हतं. आईची माया होती ती. तिच्या हातून जे घडलं ते माझ्या हातून घडू नये म्हणून ती काळजी घेत होती इतकंच.

मॉडेल म्हणून मला काही जास्त पैसे मिळत नव्हते. आईची इच्छा मी एखाद्या पैसेवाल्या रुबाबदार माणसाच्या सहवासात यावं अशी होती. मॉडेलींगमुळे हे जमायची शक्यता कमी होती.

आई कपडे शिवायचं काम कुठून कुठून मागून आणत असे. एका सिनेमा कंपनीच्या मॅनेजरने तिच्याकडे काही कपडे शिवायला टाकले. बोलता बोलता त्याला एक डान्सर हवी असल्याचे समजले. आईच्या मनाने काय घेतले कोणास ठाऊक. तिने माझ्याबद्दल त्या मॅनेजरला सांगितलं. आणि एक दिवस मला घेऊन आई त्यांच्या ऑफिसात पोचली. तिथे अगोदरच दोन-तीन तरुणी रिहर्सल करत होत्या.

आईने मला तिथे कां नेलं होतं कळत नव्हतं. कारण मला नाचाचं अंगच नव्हतं. माझ्या मैत्रिणीसमवेत एका डान्सिग क्लबात जात होते. दोन तीन घडे घेताच माझ्या मैत्रिणींनी पदन्यास आणि कटिभाग हलवायला सुरुवात केली होती, पण मला मात्र ते काही जमलं नव्हतं. माझ्यात एक प्रकारचा मर्दपणा होता. त्यामुळे संगीताचा माझ्यावर काहीच परिणाम होत नव्हता. तो चित्रकार मला एक दिवस म्हणाला होता, "सुप्रिया तू चारशे वर्षांपूर्वी जन्माला यायला हवी होतीस. आजच्या घडीला, बारीक लवचिक देहाची, लचक असलेली शर्मिला स्त्री लोकांना आवडते.

मॅनेजर आपल्या खोलीत आमची वाट पहात बसला होता. आम्ही आत गेलो.

"तुझे पाय दाखव मला."

"मी गप्पच राहिले. आईने मला ढोसले."

"त्यांना पाय दाखव तुझे."

मी साडी वर केली आणि जांघेपर्यंत त्याला पाय दाखवले. नंतर तशीच साडी वर धरून गोल फिरले आणि एक पाय थोडासा वर उचलला. माझे पाय सरळ, केळीच्या गाभ्याप्रमाणे आहेत. गुडघ्याच्या वर मांडीचा भाग जरा रुंद होत गेलाय. त्या मॅनेजरची नजर माझ्या गुडघ्यांच्या वरच्या भागाकडे होती. त्याची ती नजर मला काही बरी वाटली नाही "वय काय तुझं ?" त्यानं विचारलं.

"ऑगस्टमध्ये तिला अठरावं संपलं." आई म्हणाली. तो उठला. त्याने ग्रामोफोनवर एक रेकॉर्ड लावली आणि त्याबरहुकूम मला नाचायला सांगितलं.

मी प्रथम उजवा पाय. आणि नंतर डावा पाय वर उचलला. माझ्याकडे पहात त्याने ग्रामोफोन बंद केला. त्याने चेहऱ्यावरचे भाव बदलले आणि तो खिडकीतून बाहेर पाहू लागला.

"पसंत नाही ?" आईनं विचारलं. ती आता नेहमीप्रमाणे ओरडून तमाशा करणार असं वाटून मी तिला बाजूला ओढलं.

"पसंत नाही." तो म्हणाला, "तिला नाचता येत नाही, अन् तिला योग्य शरीरयष्टीही नाही."

"पण का ?" आई त्याच्या अंगावर ओरडली. "तिचे पाय किती छान आहेत. तिचा सुंदर चेहरा. तिच्या उरोजाकडे लक्ष दे. तुला काहीच पसंत नाही ?"

"तुझी मुलगी नर्तिकेच्या कामाला योग्य नाही. ती . . . . . ."

तो आणखीन काही बोलणार होता; पण आईने त्याला बोलूच दिलं नाही. ती रागावली होती. तिने त्याला खूप शिव्या दिल्या. शेवटी हातातले बनवलेले सारे कपडे तिने टराटरा फाडून त्याच्या तोंडावर फेकले. झाल्या प्रकाराने मी अगदी रडकुंडीला आले होते.

झालेला प्रकार मी त्या चित्रकाराला सांगितला. तो म्हणाला, "सुप्रिया तू मॉडेल म्हणूनच रहा अन् या धंद्याला कंटाळलीस की लग्न कर. मग तुझा चेहरा असलेली तुला खूप मूलं होतील. मला मात्र तू मनापासून आवडतेस."

तो चित्रकार प्रदर्शन भरवण्यासाठी परदेशी गेला. नाही तर मी त्याच्या सहवासात कायमची मॉडेलिंग करत राहिले असते. * *






[ २ ]

मॉडेल म्हणून माझा जीवनक्रम चालू होता. मला फार कमी पैसे मि ळतात म्हणून आई कुरकुरत असे. आई सारखी रागावलेली असे. तिच्या रागावण्याचं कारण मला समजलं होतं. माझ्याबद्दल तिचे खूप मनोरथ होते. मी मॉडेल होणे ही तिच्या मनोरथाची पहिली पायरी होती. मॉडेलिंग करत असताना मी कुणातरी चांगल्या माणसाच्या सहवासात येईन अशी तिची अपेक्षा होती; पण काहीच होत नव्हतं. मी आपली मॉडेल म्हणूनच काम करत होते. ह्या आया आपल्या पोरींच्या सौंदर्यावर अगोदरच मनोरथ रचतात. आणि त्यांच्या मनासारखं काही झालं नाही की मग कुरकुरत राहातात. ह्याच कारणाने कितीतरी मुली घरातून पळून गेलेल्या मला माहीत होत्या. पळून गेल्यावर ह्या मुली प्रथम जो पुरुष भेटतो त्याच्या छातीवर मान टेकून त्या जाचातून मोकळ्या होतात आणि मग कुठंतरी भरकटत सुटतात.

मी मिळविलेले सारे पैसे आईच्या हातावर ठेवत असे. मॉडेलिंगचे ज्या दिवशी काम नसे त्या दिवशी आईला मदत करत घरीच असे. सकाळपासनं संध्याकाळपर्यंत केव्हा केव्हा रात्रीसुद्धा खाली मान घालून मी शिवत बसे. स्टुडिओत जायचं असलं की, प्रथम आईला सारी मदत करूनच मग मी स्टुडिओत जात असे. जाण्याआधी लादीसुद्धा धुवून काढींत असे.

मी नेहमी माझ्या लग्नाची स्वप्ने पहात असे. आमच्या चाळी-समोरच बसस्टॉप होता. रोज सकाळी मी तिथून ट्रॉली बस पकडत असे. तिथेच जवळपास एक गॅरेज होतं. मी जायच्या वेळी तिथं नेहमी एक गोरा तरुण माझ्याकडे रोखून बघत गाडीत घुमत असायचा. त्याचा चेहरा गोरा आणि निमुळता होता. डोळे काळे होते. आणि ओठांची ठेवण तर फारच छान होती. तो राजेश खन्नासारखा दिसायचा. प्रथम मला तो खरा होता त्याहून खूप निराळा मामला. तो चांगले कपडे वापरी आणि चांगल्या सुसंस्कृत माणसासारखा वागे. बसने जाताना मी त्याला पाही आणि त्याचाच विचार करत राही. पण काही वेळाने सहज विसरून जाई. एक दिवस मी बसची वाट पहात असताना कुणीतरी शू ऽ शू आवाज केला. मी मागं वळून पाहिलं तो मला बोलावत होता. मी न घाबरता त्याच्याकडे गेले. त्याने गाडीचा दरवाजा उघडला. मी आत बसले. त्याने दरवाजा बंद केला, तेव्हा त्याच्या हाताकडे माझी नजर गेली. ते राकट होते आणि बोटे काळी जाड एखाद्या मजुरासारखी होती.

" तुला कुठं जायचं आहे ?"

त्याचा आवाज गोड होता, पण त्यात काहीतरी दोष होता. मी त्याला माझ्या स्टुडिओचा पत्ता सांगितला.

"आपण थोडं प्रथम फिरायला जाऊ. मग मी तुला स्टुडिओत पोचवतो." त्याने गाडी चालू केली.

तो वेगाने गाडी चालवत होता मला भीती वाटत होती. त्याने,





अनुक्रमणिका

माझ्यावर आपल्या बोलण्याने छाप पाडायला सुरुवात केली. त्याने गाडीला एकदम ब्रेक लावला. मी हिंदकळून त्याच्या अंगावर पडले.

"तुझं वय काय ?

"अठरा वर्षं" मी म्हणाले.

"अठराच! मला वाटलं तू फार मोठी आहेस."

"तुझं नाव ?"

"सुप्रिया. अन् तुझं ?"

"राजेश."

" तू काय करतोस ?"

" मी धंदा करतो." त्याने रुबाबात सांगितले.

"ही गाडी तुझी आहे ?"

"त्याने मोठ्या अभिमानाने गाडीकडे पाहिले.

"हां माझीच; नाहीतर कोणाची ?"

"मला नाही खरं वाटत."

"तुला का बरं खरं वाटत नाही ?" त्याने केसाची झुलपं मागं सारत विचारलं.

"तू शोफर आहेस ?"

वा किती अचूक सांगितलंस पण तुला ग कसं कळलं ?

"तुझ्या हातामुळे."

त्याने हाताकडे पाहिलं. "तरुण सुंदर मुलीपासनं काहीच लपवणं शक्य नाही. तू फार हुषार आहेस. मी खरंच शोफर आहे. आता तर झालं ना !"

"मला तू आधी स्टुडिओत पोचव." मी त्याच्या अंगावर ओरडले.

"का, असं ओरडायला काय झालं ? धंदा करतो असं खोटं बोललो, म्हणून रागवलीस वाटतं."

"आता जास्त बोलू नकोस. आधी मला स्टुडिओत घेऊन चल."

"अग मी गंमत केली. तुला गंमत पसंत नाही वाटतं."

"मला असल्या तसल्या गमती आवडत नाहीत."

"काय खोडकर आहेस ग. मला वाटलं तू कोणी राजकुमारी आहेस. आणि तुला जर मी शोफर आहे असं सांगितलं तर पंचाईत



व्हायची. म्हणून मला खोटं बोलावं लागलं."

त्याला माझ्याविषयी आस्था वाटत होती. आकर्षण वाटत होतं.

"मी काही कोणी राजकुमारी नाही. एक मॉडेल गर्ल आहे. जसा तू शोफर."

"मॉडेल गर्ल म्हणजे ?"

"मी चित्रकारांकडे जाते. त्यांच्या पुढ्यात कपडे काढून बसते. आणि मग ते चित्रं काढतात."

"तुला आई नाही वाटतं."

" आहे की."

"तुझी आई तुला परपुरुषासमोर नागवं उभं रहायला सांगते?"

"मग काय वाईट आहे त्यात ?" त्याच्या त्या प्रश्नाने त्याला माझ्याबद्दल आस्था वाटत होती असं दिसलं. त्याला चांगले आचार-विचार, नीतीमत्ता काही असल्याचं मला वाटलं. माझ्या मनातल्या नवऱ्याच्या कल्पनेशी तो जुळत होता.

"तुझ्या आईचं तुझ्यावर प्रेम नाही ?"

"कुणी सांगितलं ? तिनंच तर मला हे काम मिळवून दिलं. ती पण पूर्वी मॉडेल म्हणून काम करत होती."

त्याने मान हलवली. नंतर आपला हात माझ्या हातात देत तो म्हणाला, "तुझ्याशी ओळख व्हावी असं कितीतरी दिवस मनात होतं. आज झाली. मनाला कसं समाधान वाटलं."

"मला पण". मी म्हणाले.

त्यावेळी मला त्याच्याबद्दल निराळंच आकर्षण वाटलं. त्याने चुंबन घ्यावं असं मला वाटू लागलं आणि त्याने तसं काही केलं असतं तर मी विरोध केला नसता.

"तू मॉडेलिंग केलं नसतंस तर चांगलं झालं असतं. इतकंच मला सांगायचं होतं." तो म्हणाला. "तुझ्यासारख्या चांगल्या मुलीनं घरी राहिलं पाहिजे. कोणातरी चांगल्या माणसाशी लग्न केलं पाहिजे. संसार केला पाहिजे. मुला–बाळात रमलं पाहिजे, नवऱ्याची सेवा केली पाहिजे."

माझ्या मनातले सारे विचार तो बोलून दाखवत होता.

"तू म्हणतोस ते ठीक आहे, पण आईचंही ऐकलं पाहिजे. तीच माझं सारं कर्तव्य."

आम्ही बोलत होतो. त्याने आपल्या घड्याळाकडे पाहिलं आणि गाडी मागं वळवली. या वेळपर्यंत त्याने मला एकदाच स्पर्श केला होता. तो माझं चुंबन घेईल असं वाटलं होतं. पण तसं त्याने काहीच केलं नाही, म्हणून वाईट वाटलं.

त्याने मला स्टुडिओत पोचवलं आणि नेहमी ठराविक वेळी आल्यास स्टुडिओत पोहचविण्याचं वचन दिलं. मला आनंद झाला. त्याच्या शरीरयष्टीवर आणि स्वभावावर मी खूष झाले होते.

ही गोष्ट मी आईला सांगितली नाही. तिला कळलं असतं तर ती मला त्या माणसाला भेटू देणार नाही अशी भीती होती.



अनुक्रमणिका

दुसऱ्या दिवशी त्यानं मला सरळ स्टुडिओत पोचवलं. तिसऱ्या दिवशी तो मला गाडीतून फिरायला घेऊन गेला. त्यावेळी मी खूप भावनाप्रधान झाले होते. जरा काही हृदयाला भिडणारी गोष्ट घडली की मला रडू येई. हळूहळू मी त्याच्यावर विश्वास ठेवू लागले. त्याच्यावर प्रेम करू लागले.

मी त्याच्या इतकी प्रेमात पडले होते की त्याने माझं प्रथम चुंबन घेतलं तेव्हा माझ्याकडे ठेवलेलं भयंकर मोठं वजन उचलल्यासारखं वाटलं. मन हलकं झालं. मी पुढे पाऊल टाकलं होतं. आता कुणीही मला थांबवू शकणार नव्हतं. एका अज्ञात शक्तीनं माझ्यावर पगडा बसवला होता. चुंबन घेऊन बाजूला होताच आपण एकमेकांशी कायमचे बांधले गेल्याचं त्यानं सांगितलं. प्रथम चुंबनानं वाटलेली भीती नाहीशी होताच, मी धुंद होऊन आवेगानं त्याची कितीतरी चुंबनं घेतली.

त्या दिवसानंतर मी किती चुंबनं दिली आणि घेतली याची गणतीच नाही. एखादं नाणं जसं माणसामाणसाच्या हातून फिरत जातं तशी मी चुंबनं दिली होती. मला अजूनही ते पहिले चुंबन आठवतं. त्या चुंबनात राजेशविषयी प्रेम होतं. आयुष्यात त्याच्याशी एकनिष्ठ राहण्याचं सामर्थ्य होतं. मी गाडीतल्या गादी-वर मान टेकली होती. त्याचे ओठ माझ्या ओठांना स्पर्श करीत होते. माझ्या दातांना काही तरी थंडगार लागलं. ती त्याची जीभ होती. इतका वेळपर्यंत ती माझ्या कानात गोड गुंजारव करत होती. आणि आता ती माझ्या ओठांना अमृत पाजणार होती. अशा रीतीने कोणी चुंबन घेतं याची मला कल्पना नव्हती. मी थोड्याच वेळात बेहोष होऊन गेले आणि राजेशने लग्नाचं वचन दिल्यावर मी भानावर आले. पाप आणि पश्चाताप याशिवाय आपल्याला आयुष्यातला तो आनंद उपभोगता येणार नाही याची खात्री झाली.

रात्री मी आईला सारं सांगून टाकलं. आई मशीनवर बसून शिवत होती.

"आई मी माझं लग्न ठरवलंय." हे सांगताना माझा चेहरा गरम झाला होता.

तिचा चेहरा एकदम उतरला.

"कोण आहे तो ?"

"शोफर."

मला पुढं सांगायचं होतं पण वेळच मिळाला नाही. आई मशीन-वरून झटकन उठली आणि तिने माझे केस पकडले.

"लग्न ठरवलंस. मला न सांगता. अन् ते सुद्धा शोफरबरो-बर." आई मला आता मारणार हे नक्की होतं. मी तिच्या हाता-तून सुटले आणि बाहेरच्या खोलीत पळाले. ती माझ्या मागोमाग आली. तिचा मनावरचा ताबा सुटला होता. तिचा लहानसाच व नाजुक चेहरा रागानं थरथरत होता. ती सारखी ओरडत होती. "मी तुला ठार मारणार. मी तुला ठार मारणार. तू माझं मरण आहेस." तिने कपडे कापायची कातर उचलली आणि माझ्या अंगा-वर फेकली. मी बाजूला सरकले आणि कातर भिंतीवर आदळली. तशी ती मटकन खाली बसली.

"मी तुझ्याबद्दल किती मनोरथ केले होते." ती रडत म्हणाली "तू श्रीमंत व्हावीस, सुखी व्हावीस. तुझा सुंदर चेहरा असाच टव टवीत रहावा, पण तू आता एका भिकाऱ्याशी लग्न करणार आहेस ?"

" तो भिकारी नाही."

"भिकारी नाही!" ती खांदे हलवत म्हणाली. "भाडा जावई शोफर ! खरंच तू कमनशिबी आहेस.. माझ्यासारखाच तुझा शेवट होणार आहे. तू नवऱ्याची गुलाम म्हणून राहणार. त्याच्या मुलाची गुलाम राहणार, आणि त्यातच तुझा शेवट होणार."

"स्वतःची गाडी घेण्याइतपत त्याच्याकडे पैसे साठतील तेव्हाच आम्ही लग्न करणार आहोत."

"ही एक फोल आशा आहे. तू त्याला इथं घेऊन येऊ नकोस. मला त्याचं तोंड दाखवू नकोस. त्याला तू वाटेल तिथे भेट. हवं ते कर." ती ओघळणारे अश्रू पदराने पुसत म्हणाली.

त्या रात्री मी उपाशी पोटी झोपले. मला गळल्यासारखं वाटलं होतं. आईचा मला राग आला होता. पण काही झालं तरी तिचं माझ्यावर प्रेम होतं – आणि माझ्यावरल्या प्रेमामुळेच ती रागवत होती. माझ्या विषयी तिने अनेक मनोरथ केले होते. तिचं आयुष्य गरीबीत गेलं. कष्ट उपसण्यात गेलं. तेव्हा आपल्या मुलीनं आपलं आयुष्य सुखात घालवावं असं वाटणं साहजिकच आहे.

राजेशला भेटायचं नाही अशी तिने शपथ घेतली होती, आणि त्या बाबतीत मी तिचा मान राखला होता; पण नियमितपणे भेटी-गाठी होऊ लागल्यावर उघडपणे सारं होण्यासाठी राजेश माझ्या आईची ओळख करून देण्याविषयी माझ्या मागं भुणभुण करू लागला. काही दिवस मी त्याला टोलवलं. तू फार हल्कं काम करतोस तेव्हा माझ्या आईला तू आवडत नाहीस असं त्याला सांगायला माझं मन धजेना. मी त्याच्यापासून काहीतरी लपवून ठेवत आहे असा त्याला संशय येऊ लागला. शेवटी. नाईलाज झाला तेव्हा त्याला मी सांगितलं,

"माझ्या आईला तुला भेटण्याची इच्छा नाही. शोफरशी मी. लग्न न करता कुणा चांगल्या माणसाशी लग्न करावं असं तिला वाटतं."

त्यावेळी आम्ही नेहमीच्या ठराविक ठिकाणी गाडीत बसलो होतो. त्याने माझ्याकडे पडलेल्या नजरेने पाहिले, आणि एक निःश्वास सोडला. मी त्याच्यावर आशक झाल्यामुळे, त्याच्या त्या आविर्भावात किती खोटेपणा भरला होता हे मला त्यावेळी समजलं नाही.

"हे गरीबीचं फळ." तो काही वेळ शांत राहिला.

"तुला वाईट वाटलं ?" मी विचारलं.

"माझा अपमान झाला आहे. माझ्या जागी दुसरा कोणी असता तर त्याने तुला भेटायलासुद्धा मागितलं नसतं.

अनुक्रमणिका







"एवढं वाईट वाटून घ्यायला काय झालं. मी तुझ्यावर प्रेम करतेय ना !"

मी माझे खिसे पैशाने भरून आणायला हवेत. म्हणजे तुझी आई माझा आनंदाने स्वीकार करील."

मी काहीच बोलले नाही, कारण तो जे सांगत होता ते खरं होतं.

"तिला न कळवताच एक दिवस मी तुला तिकडे घेऊन जाईन. त्यावेळी ती काही डोळे मिटणार नाही."

मी एक दिवस राजेशला घेऊन घरी गेले. आई आपलं काम संपवून टेबल साफ करीत होती.

"आई हा बघ राजेश आलाय." मी त्याला आत नेत म्हणाले.

मला वाटलं होतं त्याला पाहून आई गोंधळ माजवील. पण ती, 'बरं' असं म्हणून दुसऱ्या खोलीत गेली. ती आत जाताच "घाबरू नको राजेश. आता मला धीर आलाय. सर्व काही व्यवस्थित होईल यापुढे" असं म्हणून चुंबनासाठी ओठ पुढे केले.

"छे छे. वेडघासारखं करू नकोस." तो हळू आवाजात म्हणाला. "माझ्याबद्दल तुझ्या आईचा वाईट ग्रह होईल."

प्रसंग पाहून कसं वागावं आणि बोलावं हे राजेशला बरोबर कळत होतं. थोडयाच वेळात आई आली आणि राजेशकडे न पाहता म्हणाली, "आम्हा दोघांना पुरेल इतकंच जेवण आहे. तू मला अगोदर का नाही सांगितलंस, म्हणजे मी

आईने आपलं बोलणं पुरं करायच्या आधीच राजेश म्हणाला "मी जेवायच्या उद्देशाने काही इथे आलो नाही. उलट मीच आज तुम्हा दोघांना घेऊन बाहेर जातो."

तो एखाद्या सुसंस्कृत आणि रीतिरिवाज माहीत असलेल्या माणसासारखा बोलत होता. अशा प्रकारचं लाघवी बोलणं ऐकायची आईला सवय नव्हती. ती थोडा वेळ स्तब्ध राहिली.

"जर सुप्रियाला जायचं असलं तर. . " ती अडखळत म्हणाली.

"मला मसाला डोसा खायचाय. समोरच्या वृन्दावनमध्ये जाऊ."

"तुला कुठं हवं तियं जाऊ." राजेश म्हणाला.

आई कपडे बदलण्यासाठी आत गेली आणि आम्ही दोघंच खोलीत राहिलो. मी भावनावश होऊन राजेशचं चुंबन घेतलं. आपल्या गोड वागण्याने त्यानं आईवर छाप मारली होती. माझा विजय झाला होता.

आम्ही हॉटेलमध्ये गेलो. तिथं गेल्यावर राजेशनं माझ्याकडे मुळीच लक्ष दिलं नाही. तो आईशीच बोलू लागला. तो आईची स्तुती करू लागला, ती तरुणपणी माझ्यापेक्षा सुंदर असली पाहिजे असं सांगू लागला. आई आपली स्तुती प्रथमच ऐकत होती. ती अगदी मारावून गेली.

मधल्या वेळात तरुणांचं एक टोळकं आमच्या बाजूच्या टेबलावर येऊन बसलं. त्यातल्या एकाने मला पाहून वाईट शब्द उच्चारले. राजेशने ते ऐकले. तो तत्काळ उठला आणि त्या तरुणापुढे बाह्या सरकावून उभा राहिला.

"तो शब्द तू पुन्हा एकदा उच्चार." राजेश म्हणाला.

"तुला त्याच्याशी काय करायचंय ? तू त्या पोरीचा कोण लागून गेलास ?"

"ही स्त्री आणि ही मुलगी माझ्याबरोबर आली आहे आणि जोपर्यंत ती माझ्याबरोबर आहेत तोपर्यंत त्यांच्यासंबंधी असणाऱ्या प्रत्येक गोष्टीशी मला कर्तव्य आहे."

तो पोरगा एकदम टरकला. "महाराजा एवढा गरम होऊ नकोस. जरा शांत हो. हा कोक घे पाहिजे तर." त्याने कोकाकोलाची बाटली त्याच्यापुढे ठेवली. राजेशनं नकार दिला तशी त्याने ती बाटली घटाघट पिऊन टाकली.

राजेश शांतपणे खिशात हात घालून टेबलावर येऊन बसला. ह्या घटनेने आई त्याच्यावर खूष झाली. शिवाय आईला त्याने खूप खायला घातले होते. बोलता बोलता राजेशने माझ्या मॉडेलिंगचा विषय काढला.

"मी मूर्ख असेन. जुन्या मतांचा असेन. काहीही म्हणा तुम्ही मला. पण सुप्रियाने कपडे उतरवून चित्रकारासमोर बसणे मला तरी बरं वाटत नाही."

"का बरं नाही ?" आईने त्याला विचारलं. वादळापूर्वीची ही निशाणी आहे असं मला वाटलं.

"एकाच शब्दात सांगायचं तर ते नीतीबाह्य आहे."

"नीती, नीती, नीती म्हणजे काय ते तरी मला सांग." माझी आई मोठ्याने ओरडू लागली. दूरच्या टेबलावर बसलेले लोकसुद्धा आमच्याकडे वळून पाहू लागले. "नीती म्हणजे सबंध दिवस काम करणे. कष्ट उपसणे, पोरांना आंघोळ घालणे, नवऱ्याचे पाय चेपणे, त्याचा नोकर म्हणून काम करणे व रात्री त्याच्याबरोबर झोपणे याला नीती म्हणतात. तू मेलास की तुझी नीती तुझ्याबरोबर खडचांत जाईल, असं मी समजते. स्वतः नग्न होऊन चित्रकारासमोर बसणे यात सुप्रिया काहीही गैर करत नाही आणि त्यासाठी लोक तिला पैसे देत असतील तर ते घेण्यातही काही चूक नाही. मी तिला असं करण्यात मदत करीन." लोक आमच्याकडे पहात असताना मला शरमल्यासारखं झालं.

"तसं करायला तू धजणार नाही." राजेश म्हणाला.

'का नाही धजणार ? तुला काय वाटलं, एका शोफरबरोबर सुप्रियाने लग्न ठरवलं म्हणून मला आनंद होईल. मुळीच नाही. सुप्रिया आपलं किंमती सौन्दर्य तुझ्या सहवासात वाया घालवील असं तुला वाटत असेल तर तू मूर्ख आहेस. महामूर्ख आहेस."

आई सारखी ओरडत होती. लोक तमाशा पाहात होते. आणि मला शरमल्यासारखं होत होतं. राजेशवर मात्र त्याचा काहीच परिणाम झाला नाही.

"सुप्रियाने माझ्या मालकिणीप्रमाणे आयुष्य घालविलं पाहिजे." राजेश म्हणाला.

"कशा प्रकारचं आयुष्य ?" मी त्याला विचारलं. मला संभाषणाला वळण लावायचं होतं.








"सकाळी अकरा बारा वाजता ती उठते." राजेश मोठ्या अभिमानाने म्हणाला. "ती बिछान्यातच ब्रेकफास्ट करते. नंतर सुवासिक अत्तराच्या पाण्याने आंघोळ झाली की मी तिला गाडी-तून फिरायला नेतो. येतांना ती मार्केटिंग करते. घरी आल्यावर लंच घेऊन थोडा आराम करते. कपाटातील कपडे विस्कटते. त्या-नंतर ती मित्राकडे जाते किंवा तिच्याकडे मित्र येतात. मग पत्त्यांचा डाव होतो. तिची सारी मित्र मंडळी खूप श्रीमंत आहे. तिच्याकडे लाखो रुपयांचे दागिने आहेत."

त्याच्या मालकिणीचे वर्णन ऐकता ऐकता आई भारावून गेली. तिचं वडवडणं आपोआप वंद झालं.

"लाखो रुपयांचे दागिने!" आईने आश्चर्यानं विचारलं. "आणि ती सुंदर आहे?"

राजेश सिगरेट ओढत होता. त्याने तोंडात आलेला तंबाखू थुंकून टाकला. "सुंदर! हं अगदी घाणेरडी आहे. सुटलेली. बुरसट-लेल्या चेहऱ्याची."

राजेश आपल्या मालकिणीचे वर्णन करत असताना, आईनं तोंडातून एक शब्द काढला नाही. कदाचित घडलेल्या गोष्टीची तिला शरम वाटत असावी.

दुसऱ्या दिवशी मी राजेशला आईबद्दलचं त्याचं मत विचार-रलं. आईच्या त्या तशा वागण्यानं आमचे संबंध दुरावतील असं मला वाटलं होतं. "श्रीमंतीचा आयुष्यात उपभोग घेता आला नाही म्हणून ती तशी वागते. गरीबीचं ते प्रतिबिंब आहे. शिवाय तुझ्या-वर तिचं प्रेम आहे, त्यामुळ तिच्या दुःखात भर पडते." राजेशने आईविषयी आपलं मत दिलं, मला पण तसंच वाटत होतं.

राजेश मला हळूहळू स्पष्ट करत होता. माझ्या शरीराशी तो निरनिराळे खेळ खेळत होता. त्यामुळे मला सुख होत होतं. तसाच पश्चातापही होत होता. तो प्रत्येक पाऊल मोजून मापून टाकत होता. त्यात घाई नव्हती की अविचार नव्हता. एखादा प्रदेश पादाक्रांत करणाऱ्या सेनापतीप्रमाणे तो वागत होता. माझ्या ओठापासून माझ्या मांड्यापर्यंत, माझ्या शरीराचं तो सुख घेत होता.

गाडीतून बाहेर पडत असताना तो माझ्या गळ्याची आणि कपाळाची चुंबनं घेत असे. एके दिवशी सकाळी तो माझे चुंबन घेत असताना त्याच्या हाताची बोटं माझ्या चोळीच्या बटणांशी फिरत असल्याचा भास झाला. त्यावेळी माझं शरीर एकदम थंड पडलं. मी राजेशच्या खांद्यावरून गाडीतल्या छोट्या आरशात पाहिलं. माझ्या चोळीचं एक बटण सुटलं होतं. मला लाज वाटली. पण मी काही ते बटण लावलं नाही. पण थोड्याच वेळात राजेशने खांद्या-वरून खाली सरकणारा पोलका मारखा केला आणि बटण लावून टाकलं. त्यावेळचा त्याचा तो अभिनय फारच प्रेक्षणीय होता. त्या अभिनयाने मी जास्तच आकर्षित झाले. दुसऱ्या दिवशी पण तो तसाच वागला. त्यावेळी मला इतकी लाज वाटली नाही. उलट मजा वाटू लागली. त्याचा तो नेहमीचाच चाळा होऊन बसला. तो तसा चाळा केव्हा करतो याची मी वाट पाहू लागले. तो तसा वागला नाही, तर त्याचं माझ्यावरचं प्रेम संपलं असंच मला वाटे. माझ्याकडून त्याच्यावर प्रेम केलं जात होतं, आणि त्याच्याशी लग्न होणार म्हणून मी आनंदात होते.

सकाळच्या भेटी-गाठीच्या वेळी आमचे खेळ चालतात याची आईला कल्पना होती. ती अधूनमधून मला टोमणे मारीत होती आणि आमचं लग्न कसं मोडावं याचा विचार करीत होती.

[क्रमशः]

| एक थरारक रहस्यकथा |

**....कोचाच्यामागे आरामात बसून सुषमाचे डोके कोचाच्या पाठीशी जोराने दाबून तिच्या मानेवरची बोटे मी सोयीस्करपणे घट्ट घट्ट करीत गेलो आणि अखेरीस**


ले. आर्थर विल्यम्स

अनु : विजय ज. पेठे





मी स्वतः खुनी असल्यामुळे एका प्रसिद्ध रहस्यकथा । लेखकाने नुकत्याच केलेल्या एका विधानाने माझे लक्ष वेधून घेतले. ते विधान असे, "सर्वात उत्तम व मनाला चालना देणाऱ्या रहस्यकथा त्या होत, ज्यात अपराध "कुणी" व "कसा" केला ह्याबरोबरच अपराध "कां" केला ह्या गोष्टीवर पण सारखाच भर दिला जातो." आनंदाची गोष्ट आहे की कथाक्षेत्रात का होईना खुनी माणसाचे व्यक्तिमत्व आता अभ्यसनीय समजले जाऊ लागले आहे. पूर्वी खुनी व्यक्तीला ओळखून काढणे व त्याला पकडण्याची साधने ह्या गोष्टींवरच जास्त डोके खपवले जात असे. परंतु माझ्या मते खून कसा केला गेला ही बाब जास्त महत्त्वाची आहे. कारण खुनाकरिता ज्या पद्धतीचा अवलंब केला गेला ती पद्धत खुनीच्या व्यक्तिमत्वाकडे निर्देश करते. किंबहुना त्या पद्धतीमुळे समजते की खुनी व्यक्ती आपल्या प्रयत्नात असफल झाल्याने प्रसिद्ध होणार की सफल झाल्याने अपरिचित राहणार.

मला येथे नमूद केले पाहिजे की आम्ही खुनी लोक नेहमीच काही चुका करीत नाही. कदाचित ही समजूत चुका केल्यामुळे पकडलेल्या खुनी माणसांवरून झाली असावी. परंतु आमची जात एकंदरीत फार कुशल आहे. माहित असलेली प्रकरणे जरी आठवली तरी पटते की आमच्या विरुद्ध पुष्कळ आघाडचा उघडल्या जाऊन सुद्धा आम्ही बरेच खून पचविले आहेत. बऱ्याच जणांची अशीही एक गैरसमजूत आहे की खुनी व्यक्ती इतरांपेक्षा दिसावयास वेगळी असते. पुष्कळ वेळा अतिशयोक्तीने तिला पागल, राक्षस, नराधम किंवा तत्सम शब्दांनी संबोधले जाते. परंतु ह्या नाटकी कल्पना तथ्यापेक्षा खूप दूर आहेत. खरे म्हणजे, खुनी व्यक्ती अगदी चार चौघांसारखीच असते; फरक एवढाच की काहीतरी विशेष करण्याची तिच्यात जास्त धमक असते.

ह्याच कारणास्तव मी केलेल्या एका खुनाची सविस्तर माहिती देण्याचा हा प्रपंच करीत आहे. ही कहाणी निवेदन करून सुद्धा तिचे माझ्याविरुद्ध काही परिणाम होतील ही भीती मला मुळीच नाही. (कधी कधी माझ्या चातुर्याचे मलाच कौतुक वाटते).

तसे पाहिले तर सुषमा बेडेकरला ठार करीपर्यंत तिच्याविषयी माझ्या मनात व्यक्तिशः अशी दुष्मनी मुळीच नव्हती. हे सांगण्यामागे उद्देश असा की काही लोकांची अशी समजूत होणे शक्य आहे की सुषमाला नाहीसे करण्यामागे सूडाची भावना होती. खरोखरच एके काळी मी तिच्यावर निःसीम प्रेम करीत होतो व तिने जर शंकर बेडेकरला नवरा म्हणून पत्करण्याचा मूर्खपणा केला नसतां तर मीच तिला पत्नीपद बहाल केले असते. आता

सुद्धा माझी समजूत ठाम आहे की तिने पैशाशी सोयरीक करण्याचे ठरवून आपला शेवट मात्र ओढवून घेतला.

कोणा एका नातेवाईकाने मरताना शंकर-करिता थोडीशी पुंजी मागे ठेवली होती. डोकेबाज शंकरने तिचा उपयोग शेअर-बाजाराच्या उलाढालीत केला व अल्प-काळातच बऱ्यापैकी पैका संग्रही केला. मी सुषमाची शंकरशी ओळख करून दिली तेव्हा त्याच्या रुबाबदार व्यक्तिमत्वाकडे ती आकर्षिली गेली. शंकरच्या सधनपणा-विषयी प्रचलित असलेल्या गोष्टीमुळे त्याच्या विषयी तिच्या मनात आधीच औत्सुक्य होते. सुषमाला पण शंभरातले एक असे सौंदर्य लाभले होते. साहजिकच तो तिच्या रूपावर व ती त्याच्या वडेजावा-वर भाळली, इतकी की माझ्याशी झालेला साखरपुडा तोडताना तिला मुळीच खंत वाटली नाही. लौकरच ती दोघे विवाहबद्ध होऊन परस्परांच्या सहवासाचा मनमुराद आनंद लुटावयास युरोपला निघून गेली.

सुषमा म्हणजे माझ्या जीवनातील एक संपलेलं प्रकरण ह्या दृष्टीने मी वागू लागलो व पुन्हा तिची भेट होईल अशी कल्पना सुद्धा मनात येऊ दिली नाही. जवळ जवळ दीड वर्षानंतर एका सायंकाळी हातात एक सूटकेस घेऊन सुषमा माझ्या दारी दत्त म्हणून उभी राहिली. सद्गृहस्थ ह्या नात्याने मी तिला अभिवादन केले व तिला आत घेतली. माझ्या अभ्यासिकेतील कोचावर ती आरामशीर बसली व आपली कर्मकथा सांगू लागली. तिने जे सांगितले त्यात आश्चर्य करण्यासारखे मला काहीच वाटले नाही. मला कल्पना होतीच की शंकरच्या हुकुमी व्यक्तिमत्वासमोर ती फार काळ तग धरू शकली नसती. त्याची हुकुमत सहन करण्याची तिची शक्ती खलास झाली त्याच वेळेस तिने त्याच्याकडे पाठ फिरविली व जुन्या मैत्रीखातर मी तिला मदत करीन अशा विचाराने ती माझ्याकडे आली.

सुषमेला कल्पना नव्हती की तिला मदत करण्यास मी मुळीच उत्सुक नव्हतो. उलट तिच्या येण्यामळे जुन्या कटु आठवणी माझे मनाला टोचत होत्या. माझा अवमान करून गेल्यावर मी तिला पूर्णपणे विसरुन गेलो होतो व आपल्या कुक्कुटपालन केंद्राकडे मी सर्व लक्ष केंद्रित केले होते. स्वयंचलित साधने व उपकरणी बसवून मी त्या क्षेत्रात चांगलाच लौकिक मिळवला होता. कोंबड्या-वर माझे फार प्रेम होते व त्यांची सर्व व्यवस्था स्वतःच पाहाणे मला पसंत होते. सुषमाला ठेवून घेणे ह्याचा अर्थ माझ्या कार्यापैकी कमी महत्त्वाचे परंतु आवश्यक असे काम तिच्या करता मला तहकूब ठेवावे लागले असते, माझ्या दैनंदिन कामात अड-थळा उत्पन्न झाला असता व माझ्या तीन हजार इवल्या इवल्या कुक्कुटांकडे जाती-निशी लक्ष पुरविले न गेल्यामुळे त्यांना काही विकार होऊन माझ्या धंद्यावर विपरीत परिणाम होण्यास वेळ लागला नसता. ही गोष्ट मला रुचण्यासारखी मुळीच नव्हती.

दुर्दैव असे की सुषमाला टाळण्यासारखे संयुक्तिक असे कारण मला सुचले नाही. तिने येण्याची वेळ पण खुबीने साधली होती. कमीत कमी रात्रभर तरी तिला माझ्याकडे मुक्काम करावाच लागला असता कारण गावात सोयीस्कर अशी उतरण्यासारखी दुसरी जागा नव्हती व मुंबईला परत जाण्या-करिता दुसऱ्या दिवशी पहाटेपर्यंत गाडी नव्हती. मला माहित होते की सुषमाला रात्रभर जरी राहू देण्याकरिता मी पर-वानगी दिली असती तरी दुसरे दिवशी तिची पीडा टाळणे मला फारच जड गेले असते. कारण मागे सांगितल्याप्रमाणे मी तिच्यावर एके काळी खरेखुरे प्रेम केलं होते. त्या काळात मी तिला अभिवचन पण दिले होते की जरी आपल्या दोघांमध्ये कधी काही वितुष्ट निर्माण झाले तरी मदतीची केव्हाही आवश्यकता असल्यास माझे दार तिच्या करिता उघडे राहील. तिच्या अड-चणीच्या वेळी मी माघार घेतली ह्याची जाहिरात तिने आमच्या मित्रमंडळीत करावी हे पण मला खपले नसते.

हे सर्व विचार सुषमा आपली कहाणी सांगत असताना माझ्या डोळ्यात भिरभिरत होते. तिचे बोलणे ऐकून घेण्याच्या बहाण्या-खाली मी गप्प राहिलो होतो व एकाएकी मला उमगले की माझ्या गप्प राहण्याचा अर्थ सुषमाने मला तिच्याविषयी सहानु-भूती वाटत आहे असा घेतला होता. मला त्रास होऊ लागला की सुषमा-शंकरचे प्रक-रण सोडवण्याचे कामी वकीलांच्या ठायी माझी अल्प पुंजी व अमूल्य वेळ खर्च होत आहेत, माझ्या आरामशीर जीवनाला खीळ बसत आहे. मला इतका राग आला की वाटले आत्ताच्या आत्ता सुषमाची मान मुरगळावी.

परंतु मान मुरगळणे वाटले तितके सोपे नव्हते. तिच्या समोर उभे राहण्याची धमक नसल्यामुळे कोचाच्या मागल्या बाजूला जाऊन तिच्या मानेवर बोटे दाबणे जास्त सोईस्कर झाले. कारण तशा अवस्थेत तिचे डोके मी कोचाच्या पाठीशी जोराने दाबू शकलो. शिवाय ती मेल्याची पूर्ण खात्री होईस्तोवर मी कोचामागे आरामात बसू शकलो. काही क्षणांपूर्वी तिचा सौंदर्याने बहरलेला चेहरा आता जीभ बाहेर लोंब-कळत असल्यामुळे फारच भेसूर दिसत होता. ती पूर्ण मेली आहे ही खात्री झाल्या-वर मी तिची जीभ तोंडात ढकलली व तिच्या प्रेमाची विल्हेवाट लावण्याच्या मार्गा-वर लागलो. हे काम मी त्याच रात्री सुरू केले. तशी इतकी घाई करण्याचे कारण नव्हते. कारण सुषमाविषयी चौकशी सुरू होण्यास काही दिवसच काय आठवडेसुद्धा जावे लागले असते; परंतु माझ्या डोक्यात जी नामांकित योजना तयार झाली होती तिला मूर्तरूप देण्यास मी फारच उत्सुक होतो व म्हणूनच मी वेळ दवडणे पसंत केले नाही. दुसऱ्या दिवशी मी नेहमीप्रमाणे कुक्कुटपालन केन्द्राची कामे सुरू केली.

साधारण तीन आठवड्यांनंतर एका दुपारी कॉन्स्टेबल धावरे माझ्या निवास-स्थानी हजर झाला व सौ. वेडेकर ह्या व्यक्तीविषयी काही माहिती आहे का विचारू लागला. हा कॉन्स्टेबल फारच तल्लख म्हणून प्रसिद्ध होता. मला सौ. वेडे-करविषयी माहिती नक्की आहे अशी त्याची खात्री असल्याचे मात्र वाटले. कारण त्याचा

प्रश्न विचारण्याचा. रोख्नच तसा होता. सुषमा नाहीशी झाल्याची बातमी पोलिसांमध्ये कुणीतरी दिली होती व तपास माझ्यापर्यंत आला. म्हणून मी धावरेला विश्वासात घेण्याचे ठरविले. मी त्याला संक्षेपात सुषमाजवळ माझे पूर्वी काय संबंध होते त्याविषयी कल्पना दिली. साधारण तीन आठवर्षांपूर्वी ती माझ्याकडे आली होती हे पण ठोकून दिले. पण ती त्याच रात्री निघून गेली असल्याचेही सांगावयास विसरलो नाही. साहजिकच धावरेला ह्या प्रकरणी विशेष जाणून घेण्याची इच्छा झाली. त्याचा पुढील प्रश्न सुषमाची व माझी भेट झाली होती हे मी पोलीसचौकीवर येऊन कां सांगितले नाही हा होता. कारण वर्तमानपत्रात सुषमा नाहीशी झाल्याची वार्ता प्रसिद्ध झाल्यानंतरच ती माझ्याकडे आलेली होती. मी सांगितले की मी वर्तमानपत्र कधीच वाचत नाही आणि जरी तिच्याविषयी वर्तमानपत्रात आलेली माहिती वाचली असती तरी मी त्याविषयी बोललो नसतो कारण सुषमा आपल्या नवऱ्याला सोडून आलेली होती. तिने माझ्याकडून मदतीची अपेक्षा केली होती परंतु मी ती नाकारली होती. म्हणून तिचे व माझे कडाक्याचे भांडण झाले व शेवटी रागाने ती आपली सूटकेस मागे ठेवून निघून गेली.

ह्यावर धावरेने सूटकेस पहाण्याची इच्छा दर्शविली. मी त्याला ती दाखविली. कुलुप नसल्याने धावरेने ती उघडली. वरतीच एक ब्राऊन रंगाची हँण्डबॅग होती. तीत काही पैसे, कर्णभूषणे, एक मोत्यांचा नेकलेस, खड्याची एक आंगठी, बायकांच्या इतर काही वस्तू व किल्ल्यांचा एक जुडगा अशा वस्तू होत्या. त्या किल्ल्यांपैकी एक सूटकेसला बरोबर बसली. धावरेचा पुढील प्रश्न "सौ. वेडेकर यांनी त्यादिवशी काय कपडे पेहेरले होते?" इतक्या लवकर येईल अशी कल्पना नव्हती. मी ती सूटकेस त्या रात्री उघडली होती व किल्लीची व्यवस्था करण्याचा प्रश्न उद्‌भवू नये म्हणून मी ती सूटकेस कुलूप न लावताच बंद केली होती. ह्या सर्व हालचालीत मी हातमोजे वापरले होते कारण बोटाचे ठसे उमटून अपराध्यांच्या हातून नेहमी घडणारी ही क्षुल्लक चूक माझ्याकडून न व्हावी अशी माझी इच्छा होती. धावरेच्या प्रश्नाला मी एक ठरवून टाकलेले उत्तर दिले. धावरेने सूटकेसमधून एक चुरगळलेली साडी बाहेर काढून सुषमाने ती त्या दिवशी पेहेरली होती का म्हणून विचारले. होय म्हणण्याइतका मी काही गाफील व मूर्ख नव्हतो. आणखी काही बारीकसारीक प्रश्न विचारून धावरेची स्वारी सूटकेसनिशी माझ्या घराबाहेर पडली.

आणखी काही दिवस तरी पोलीसांनी मला त्रास दिला नाही. परंतु चौकशी करावयास पुन्हा माझ्याकडेच त्यांना यावे लागेल ही कल्पना होती. कारण सुषमाच्या तपासाचे धागेदोरे माझ्या घरापर्यंत मिळालेच होते व जोपर्यंत दुसरीकडे तपास करण्याइतपत सबळ कारण मिळत नाही तोपर्यंत पोलीसांनी आपले लक्ष माझ्या येथेच केंद्रित केले असते. धावरे जेव्हा पुन्हा माझ्याकडे आला तेव्हा त्याच्याबरोबर वेळेआधीच टक्कल पडलेला राघोजी पोलीस पण होता. त्याशिवाय मुंबईच्या गुप्तहेर खात्यापैकी एक मनुष्य पण होता. ह्या गृहस्थाचे नाव लवंदे असून तो इन्स्पेक्टर होता. ही माहिती धावरेने पुरविली. लवंदे महाशय उंच, रुबाबदार व एखाद्या पोलीस अधिकाऱ्याऐवजी नट म्हणूनच जास्त शोभत होते.

औपचारिक प्रश्न झाल्यावर इन्स्पेक्टर साहेबांनी माझ्या घराची तपासणी घेण्यास माझी अनुमती मागितली. त्यांच्या सुपीक डोक्यात एक कल्पना घोळत होती—कदाचित माझ्या नकळत सुषमा माझ्या कुक्कुटपालन केंद्रातच कुठेतरी पोलीसांचा ससेमिरा चुकविण्यास लपून राहिली असावी. मी पण ह्या कल्पनेस दुजोरा दिला व माझे कुक्कुटपालन केंद्र त्यांना दाखविण्याची तयारी दर्शविली.

कुक्कुटपालन केंद्राकडे जावयाच्या आधी मी लवंदेना सांगितले की मला बाहेरील मदतीची अपेक्षा नसल्यामुळे मी आपले घर व कुक्कुटपालन केंद्र शक्यतोवर ऑटोमॅटिक साधनांनी सुसज्ज केले आहे. मी त्यांना स्वयंपाकघरातील कोळसे ठेवण्याची जागा दाखवली. ही जागा म्हणजे एक छोटीशी खोलीच होती व चुलीना लागून होती. स्वयंपाकघराच्या खाली भूमिगत पावसाचे पाणी साठवून ठेवण्याकरिता एक टाकी होती. तिला एक पंप होता व शिवाय तेथपासून बाथरुमपर्यंत नळ घातलेले होते. घराला आवश्यक इतकं पाणी गच्चीवर बांधलेल्या टाकीतून मिळत असे. घराची पाहणी झाल्यावर आम्ही कुक्कुटपालन केंद्राकडे निघालो. तिकडील फेरफटका, साधारण ३०० फूट लांब व अनेक विभाग असलेल्या कोंबड्यांच्या घरापासून सुरु

# भारतात पहिल्यानेच !

# नव्या भिंतींसाठी नवा पेण्ट —

# डेकोप्लास्ट

नव्या प्लॅस्टरवरही प्रायमरशिवाय
लावता येतो.
उन्हापावसात
वर्षानुवर्षे
टिकून राहतो.

**सिमेंट पेण्टशी तुलना केल्यास**

- मजुरीचा खर्च ४०% कमी
- रंगकामाच्या ७ क्रियांऐवजी ‑‑नेनच पुरेत!
- पाचपट जास्त भाग रंगविता येतो!

डेकोप्लास्ट बेस व्हाइटमध्ये मॅजिकटच मिसळून ४० मनपसंत रंगछटा झटपट तयार करता येतात. शिवाय ५ पक्के, गर्द रंग तयारच मिळतात.

asian paints
DECOPLAST
Water thinnable exterior wall paint
BASE WHITE
FOR DIRECT USE ON NEW PLASTER

जीवनातील रंगसंगती म्हणजेच एशियन पेण्टस्

AIYARS-A-70 MAR

केला. तेथून ऐकू येणाऱ्या आवाजावरून हजारो कोंबड्या अंडी उबवण्याचे कार्य करीत असल्याचे कळत होते. त्या विभागाची पाहणी झा.यावर एका कारखान्यावजा इमारतीकडे आम्ही आपला मोर्चा वळविला. तेथे एक ट्रॅक्टर, धान्य झोडपण्याचे यंत्र व इतर बरीच यंत्रसामुग्री होती. त्या इमारतीला लागूनच अनेक छोटी छोटी कोठारे होती. त्यात आख्खे मके, मक्याचे पीठ, मक्यापासून बनविलेले पदार्थ, मांसापासून व हाडांपासून तयार केलेली खाद्यसामुग्री, तसेच जनावराना खायला घालावयाच्या पदार्थांचा स्टॉक करून ठेवलेला होता. तेथून जवळच माझी शेतजमीन होती. काही अंतरावर गाई, बैल व तट्टे पडीक जमिनीवर उगवलेले गवत खात होती.

सर्व तपासणी झाल्यावर लवंदे महाशयांनी माझे आभार मानले व जराशा निराशाजनक मुद्रेनेच त्यांनी, धावरे व राघोजीबरोबर प्रयाण केले.

यानंतर एक आठवडा शांतच गेला. तरीपण माझ्यावर सारखी पाळत असल्याचे मला जाणवत होते. अलीकडे राघोजी रात्री गस्त मारत असताना माझ्या घरावरून फेऱ्या मारीत असे. वास्तविक त्यामुळे त्याला जरा लांब वळसा पडत असे. परंतु त्याबरोबरच घर व समोर असलेल्या मैदानाकडे सफाईने नजर फिरविता येत असे. आता काहीतरी हालचाल केली पाहिजे असे मला वाटू लागले. दुसऱ्या दिवशी एक कंदील, 'स्टो' व इतर काही जरूरी सामान बरोबर घेऊन मल्या पहाटेच मी माझ्या जुनाट मोटारीमध्ये बसून जास्तीत जास्त वेगाने निघालो. पाच मैल अंतर कापल्यावर मी वेग एकदम कमी केला व मोटार रस्त्यापासून लांब असलेल्या एका गर्द झाडीमध्ये गाडी लपवून ठेवली. तेथून जवळच एका जुन्या राजवाड्याचे भग्नावशेष होते. त्याच्या चारी बाजूला किंचित जंगलवजा वातावरण असल्यामुळे तिकडे फारसे कुणी कधी फिरावयास धजत नसे. माझ्या कल्पनेप्रमाणे पोलिसांनी तेथे तपासणी आधीच केली असण्याची शक्यता होती. त्यामुळे मला तेथे काही दिवस आरामाने रहावयास हरकत नव्हती. एका बऱ्यापैकी मोडकळीस आलेल्या खोलीमध्ये मी माझा मुक्काम ठोकला. कोंबड्यांची काळजी करावयाची आवश्यकता नव्हती कारण त्यांच्या खाद्याचा मी पुरा बंदोबस्त केला होताच. मी बरोबर दोन रहस्यकथा आणल्या होत्या वेळ काढण्यास. त्यांचे वाचन सुरू केले. त्यातल्या कथा बऱ्या होत्या.

तिसऱ्या दिवशी सकाळी मनात आले आता गावात प्रकट होण्यास हरकत नाही. घरासमोर गाडी थांबविल्यावर प्रथम दर्शन झाले ते धावरेचे. माणसाच्या चेहऱ्यावर एकाच वेळी आश्चर्य, उत्तेजन, समाधान, औत्सुक्य इत्यादि भाव दिसणे कठीणच. परंतु धावरेच्या चेहऱ्यावर मात्र त्या सर्व छटा क्षणार्धात उमटून गेल्या. मी कुठे होतो इतके दिवस ह्या धावरेच्या प्रश्नाला मी उत्तर दिले की मी जुन्या राजवाड्याच्या बाजूला गेलो होतो सुषमाच्या शोधात. तेथील जंगलात मी वाट चुकलो व आज सकाळीच मला योग्य मार्ग सापडला. धावरेने जरा चिडूनच दात ओठ खाल्ल्यासारखे केले. उघडच होते की मला शोधण्याकरिता लांबवर जाळे पसरून ठेवले होते परंतु मी इतक्या नजीकच्या ठिकाणी असेन ही कल्पना धावरेला झाली नाही.

धावरे पुढील उपाययोजना काय करावी ह्या विचारात असताना माझ्या गैरहजेरीत काय काय उलाढाल्या झाल्या ह्याचा मी आढावा घेऊ लागलो. त्या येवढ्या प्रमाणावर झाल्या असतील अशी कल्पना मी केली नव्हती. कारण माझ्या सर्व स्थावर मालमत्तेवर नुसता धुमाकूळ माजून राहिला होता. जेथे पहावे तेथे पोलीस दिसत होते. घराच्या गच्चीवर, आजुबाजूला, घराच्या आत. काही जमीन तपाशीत होते तर काही खोदून काही सापडते का म्हणून प्रयत्न करीत होते. कोठारात जोरदार हालचाल वाटत होती कारण त्यातील सर्व सामान व अवजारे इतस्ततः विखरून पडलेली होती. सर्वात विलोभनीय दृश्य म्हणजे पाळलेल्या सर्व कोंबड्यांना बाहेर हाकलून देण्यात आले होते. त्या कोंबड्या सारख्या इकडे तिकडे बावरल्यागत फिरकत होत्या व त्यामुळे पोलीसांना त्यांना पायदळी चुकविता चुकविता अगदी नाकीनऊ आले होते. तेवढ्यात एका पोलीसाला त्याच्या एका सहकाऱ्याने काही तरी मोठ्याने विचारले. त्याला उत्तर देताना त्याहून मोठ्याने त्या पोलीसाला ओरडावे लागले. त्यांच्या त्या आवाजाने कोंबड्या एकदम घाबरल्या व सामूहिक रूपाने त्यांनी एकदम पंख पसरून उड्डाण केले. त्यासरशी धूळ, गवत, इत्यादि विखुरलेल्या वस्तू हवेत उचलल्या गेल्या व त्यात त्या माणसाना काही दिसेनासे झाले. त्या दृष्याचा उपभोग मी जास्त वेळ घेऊ शकलो नाही कारण धावरेने मात्र पोलीस स्थानकावर काही जरूरी प्रश्नांची उत्तरे देण्यास बरोबर येण्यास सांगितले. तेथे लवंदे होतेच. त्यांनी मला प्रश्न विचारावयास सुरुवात केली, परंतु मी देत असलेल्या उत्तरांना ते काहीच महत्त्व देत नाहीत असेही ते भासवू लागले.

माझी तिसरी सिगारेट असतानाच एक पोलीस अचानक आत शिरला व मयताचा देह सापडला म्हणून जोरजोराने श्वास घेत ओरडला. मी एकदम खुर्चीतून उठलो व आश्चर्यमिश्रित सुरात विचारले "खरंच! कुठे सापडले प्रेत?" त्याच वेळी मी लवंदेकडे पाहिले. ते तीक्ष्ण दृष्टीने माझे निरीक्षण करीत होते. मला पकडण्याकरिता बेटे काय काय युक्त्या योजित होते. लवंदेनी फार्स चालू ठेवला व प्रेताची जागा विचारली. त्या पोलीसाने मनात आली ती एक जागा ठोकून दिली व त्याने तसेच लवंदेनी माझ्याकडे प्रश्नार्थक मुद्रेने पाहिले. मी म्हटले "याचा अर्थ सुषमाचा खूनच झाला नाही का? परंतु माझ्या मते प्रेत पुरण्यास ती योग्य जागा नव्हे."

कुणालाही सुषमाचा देह सापडणे शक्यच नव्हते. मी तिला जाळून तर टाकली नाही ना ह्या शंकेचे निरसन करण्याकरिता त्यांनी तिच्या रक्षेचा एखादा कणतरी मिळतो का म्हणून भट्टी व धूर वर जाऊ देणारी चिमणीसुद्धा तपासली. मी कदाचित रसायने वापरून सुषमेचा देह विरळ केला






अनुक्रमणिका

असेन म्हणून पोलिसांनी गटारे पण उघडून पाहिली. थोडक्यात म्हणजे त्यांनी सर्व युक्त्या प्रयुक्त्या मला गोत्यात आणण्याकरिता योजल्या परंतु त्या निष्फळ ठरल्या. सुषमाचा खून करण्यामागे माझा उद्देश काय असावा हे 'कोडे' त्यांना नीट उलगडण्यासारखे नसल्यामुळे हळूहळू माझ्यावरचा त्यांचा संशय दूर होऊ लागला व काही दिवसांनी लवंदे ही केस उलगडण्यासारखी नाही असा शेरा मारुन मुंबईला रवाना झाले. माझ्या मनात त्यांच्याविषयी व धावरेविषयी काही किंतु नाही हे दर्शविण्यासाठी त्याच वर्षी दिवाळीत मी त्या दोघाना चिकनसूपचे काही डबे भेट म्हणून पाठविले. हो, त्याच्या आधीच धावरेला सब-इन्स्पेक्टर म्हणून बढती मिळून तो दुसऱ्या एका लहानशा शहरात आपल्या कामावर रुजू झाला होता. तसा तो गांवात लोकप्रिय असल्याने गावातील लोकांनी त्याला प्रेमाचा निरोप दिला होता व त्याप्रसंगी घडवून आणलेल्या समारंभात कोंबड्यांचा व तत्सम खाद्यपदार्थांचा मीच पुरवठा केला होता.

माझा धंदा तेजीत असल्यामुळे कोंबड्यांकरिता नवीन जादा खुराडे बांधण्याची योजना मनात घोळू लागली होती. परंतु त्याकरिता मला वेळ अपुरा पडू लागला. म्हणून घराची व्यवस्था तरी नीट लागावी ह्या उद्देशाने एक तरतरीत, सुदृढ व दिसावयास बऱ्यापैकी अशी १८/१९ वर्षाची एक पोरगी कामास ठेवली. ती आपले काम चोख बजावते. त्यामुळे मलापण फावला वेळ मिळू लागला आहे व मी केलेल्या खुनाची ही हकीगत वाचकांकरिता लिहून काढणे शक्य झाले आहे.

ही गोष्ट प्रसिद्ध झाल्यावर जी मजा होईल तिजकडे माझे डोळे लागून राहिले आहेत. विशेषेकरून आपण ज्या गुबगुबीत कोंबड्यांवर ताव मारला त्यांचे रहस्य धावरेला समजल्यावर त्याची काय प्रतिक्रिया होईल हे जाणून घेण्यास मी फारच उत्सुक आहे. त्या बिचाऱ्याला काय माहित की कोंबड्यांची पिले सुषमाच्याच देहावर पोसली जात होती. ह्याचा अर्थ हा नव्हे की ती पिले आपल्या नाजूक चोचींनी सुषमाच्या लुसलुशीत देहाला आघात करून तिचा आस्वाद घेत होती. उलगडाच करून सांगावयाचे म्हणजे कोंबड्यांना व पिलांना सुषमाचे शरीर प्रमाणबद्ध परिमाणात दिले गेले होते. तिच्या देहाचा प्रत्येक अवयव माझ्या कुक्कुटपालन केंद्रातील वेगवेगळ्या यंत्रांमधून गेला होता. तिच्या मांसाचे, रक्ताचे व हाडांचे उत्तम प्रतीचे खाद्य बनविण्यात आले होते. ह्या कामात मला अडचण अशी वाटली नाही कारण पूर्वीपासून गुरे व जनावरे यांच्या मृत देहाची अशीच विल्हेवाट लावीत असे. तो माझ्या धंद्याचाच एक भाग होता. सुषमा तर बोलून चालून मानवप्राणीच होती. फक्त काळजी एवढीच घ्यावी लागली की तिच्या देहाचे मला अगदी चूर्ण करावे लागले. तिच्या दातांना मात्र बऱ्याच वेळा दळणयंत्रात प्रवास करावा लागला. तिच्या केसांपासून मी एका प्रकारचे डांबरच तयार केले. तिच्या प्रेताची विल्हेवाट लावल्यावर ज्या ज्या गोष्टींना तिचा स्पर्श झाला होता त्या स्वच्छ केल्या. नंतर मी कांही जनावरांचे मृत देह वेगवेगळ्या मशिनींमधून प्रोसेस केले. त्यामुळे मानवी देहाचे उरले सुरले अवशेष पण नाहीसे झाले. सुषमेच्या देहापासून तयार केलेले खाद्य पदार्थ काही विशिष्ट प्रमाणांत, प्रयोगासाठी म्हणून ठेवलेल्या कुक्कुटांच्या एका बॅचला देण्यास सुरुवात केली. आणि काय सांगू ती पिले अशी काही गुबगुबीत निघाली की धावरेच त्याविषयी प्रमाणपत्र देऊ शकेल. माझ्या प्रयोगामुळे माझ्या मालाला भलतीच मागणी येऊ लागली आहे व वेळप्रसंगी पुरवठा करणे जड जाऊ लागले आहे.

मला खात्री आहे की हे प्रकरण कुणा बड्या पोलीस अधिकाऱ्याच्या वाचनात आल्यास पुन्हा एकदा इन्स्पेक्टर लवंदे यांच्याकडे सुषमाच्या खुनाचे रहस्य उलगडण्याची जबाबदारी येईल. परंतु त्याचा काही उपयोग होणार नाही. कोंबड्यांची चिरफाड करुन पहाण्यात पण अर्थ नाही. कारण ज्या कोंबड्यांनी सुषमाच्या मृत देहाचे अवशेष खाल्ले त्या कोंबड्यांपैकी प्रत्येक माणसाचे भक्ष्य बनावे ही काळजी मी घेतली होती. साधारणपणे लोक कोंबड्यांची हाडे खात नसल्यामुळे ही कोंबड्या विकताना किंवा भेट म्हणून पाठविताना त्यांची हाडे मला परत मिळावीत अशी विनंती करीत असे कारण हाडांपासून खाद्य तयार करण्यासाठी माझ्याकडे पुरेशी हाडे नव्हती. ही हाडे मिळाल्यावर इतर हाडांबरोबर ती परत मशिनींनी प्रोसेस केली जात. याशिवाय सुषमेला नाहीशी करण्यात मला अप्रत्यक्षपणे मदत केली असे पुष्कळ लोक आहेत. ह्या लोकांना सुषमेच्या देहावर पोसलेल्या कोंबड्यांनी घातलेली अंडी देण्यात आली होती.

ही गोष्ट आमच्या गावातील लोकांनी वाचली तर माझ्याबद्दल त्यांचा ग्रह नक्कीच वाईट होईल. माझ्याकडे ते यावयास घाबरतील, पण त्यामुळे माझा फायदाच होईल. कारण मग नवनवे प्रयोग करण्यास मला कसलीही अडचण पडणार नाही.

हो, एक नवीनच प्रकरण उद्भवू पहात आहे. माझ्या घराची व्यवस्था पहाण्यास मी जी मुलगी ठेवली आहे ती जरुरीपेक्षा जास्त लक्ष माझ्याकडे देऊ लागली आहे. माझ्या एकलेपणाविषयी तिला सहानुभूती वाटत आहे असे दिसते. ह्याची परिणती माझ्या प्रेमात न पडण्यात झाली म्हणजे नशीब. मी मनाचा हळवा असल्यामुळे माझ्या प्रेमाची अपेक्षा तिने करु नये असे स्पष्ट सांगून मी तिचे मन दुखवू इच्छित नाही. तसेच तिचे शिक्षणही बेताचेच असल्यामुळे तिला दुसरी नोकरी शोधण्यास त्रास व्हावा हीपण माझी इच्छा नाही. मी तिला सुचविले आहे की तिने वेळ जाण्यास बाहेर फिरावयास जावे, विशेष करुन संध्याकाळच्या वेळी. परंतु तिने सांगितले की एकटे फिरणे कंटाळवाणे होईल कारण तिला कोणी मैत्रिणी नाहीत की नातेवाईक नाहीत. बिचारी! तिची काळजी करणारे मागे पुढे कोणी नाही व मला पण कोंबड्यांच्या पिलांची पुढील बॅच आणखी उत्तम दर्जाची निघावी अशी तीव्र इच्छा झाली आहे. ● ● ●

अनुक्रमणिका

एक भूलभुलैयी चित्रकथा



# पराजित

—श्रीधर घैसास

निघूया ना आता रजनी? धुंद होऊन हवेत तरंगणाऱ्या रजनीला मी नाचता नाचता हळूच सुचविलं.

हुं ऽऽ मनाविरुद्ध होकार द्यावा तसा सूर काढीत रजनी हुंकारली आणि अधिकच माझ्याजवळ सरकली. अगदी जाणून-बुजून पण कमालीच्या सहजतेनं! वास्तविक बॉलडान्सच्या वेळी फार अंगचटीला न येताही नाचता येतं—दोघांचीही तशीच इच्छा असल्यास...पण हा मात्र अधिक झालेल्या ड्रिंकचा प्रभाव होता! आणि कदाचित् त्यामुळेही असेल पण असा प्रयत्न मघापासूनच तिनं चालविल्याचं मला जाणवत होतं व मीही ते ओळखून अगदी सहजगत्याच तिच्यापासून मागे सरकून योग्य ते अंतर राखीत होतो.

यावेळी मात्र तिची पकड जास्तच घट्ट भासली आणि मी काही बोलणार तोच रेकॉर्ड थांबली व नाईलाजानं तिला दूर होणं भागच पडलं...सावज टप्प्यात यावं आणि ऐनवेळी बंदुकीतील गोळी संपावी म्हणजे जी विफलता येत असेल तोच भाव मला तिच्या चेहऱ्यावर दिसला. मी मोठ्या प्रयासानं हसू आवरलं आणि सुटकेचा निश्वास सोडून जवळ जवळ तिला ओढीतच कर्नलसाहेब आणि त्यांची बायको ज्या ग्रूपमध्ये बोलण्यात गुंतली होती तिथे गेलो. औपचारिकपणे हसून त्या दोघांचा आम्हा दोघांतर्फे निरोप घेतला आणि इतरांना नुसतं खुणेनंच 'गुड–नाईट' विश् करून बंगल्याच्या पायऱ्या उतरण्यास सुरुवात केली.

बाहेर स्वच्छ चांदणं पडलं होतं. रात्रीच्या त्या शांत वातावरणाला, नव्यानंच सुरू झालेले वॉल्ट्झचे धुंद सूर हळुवारपणे छेदून जात होते. हवेत अगदी हवाहवासा वाटणारा सुखद गारवा होता. आणि त्यातच भर म्हणून रजनीनं लावलेल्या सेंटचा वास वाऱ्याबरोबर डोक्यात शिरून अधिकच बेहोषी आणित होता. मला अधिकच अस्वस्थ करीत होता.

पण हे अनुभविण्याच्या मनःस्थितीत मी नव्हतोच आणि तो घेण्याचीही माझी इच्छा नव्हती. इच्छा होती एकच आणि ती म्हणजे रजनीला शक्य तितक्या लवकर तिच्या घरी पोचविण्याची आणि स्वतःला त्या जबाबदारीतून मोकळा करण्याची!

पुढं होत गाडीचा दरवाजा उघडून रजनीला मी आत बसविलं आणि इतका वेळ चुपचाप असलेल्या रजनीला बोलकी करण्यासाठी म्हणून सहजच विचारलं,

'So ? how you enjoyed it'
आणि लगेच मी गाडी स्टार्ट केली.

'O simply wonderful !' डोळे अर्धवट मिटून घेत आणि स्टिअरिंग व्हीलवर उगीचच हळूवारपणे आपलं नाजुक बोट फिरवीत ती पुटपुटली.

'आज राजन हवा होता नाही? आजच नेमकं पुण्याला जावं लागलं त्याला. He has missed a great event . . आता कर्नल साहेबांची पार्टी चुकणं म्हणजे . '
मी वाक्य अर्धवट सोडून सहानुभूतीच्या स्वरात म्हणालो.

'मी त्याला जाऊ नको म्हणून सांगून सांगून थकले पण अरुणच्या वहिणीचं लग्न आणि इतक्या आग्रहाचं आमंत्रण . . ते कसं मोडवणार राजनला ? लग्नपत्रिकेच्या जोडीला तीन पत्रंसुद्धा आली आवर्जून येण्याबद्दल.

'मग तू कशी गेली नाहीस ? तिला प्रश्न करीत मी गिअर बदलला.

'मला अगदी वैताग आला होता पुण्यापर्यंतच्या प्रवासाचा. राजन म्हणत होता सारखा तूही चल म्हणून . पण कर्नलसाहेबांची पार्टी एकानं कोणी तरी अटेण्ड केलीच पाहिजे असं मी म्हटल्यावर त्यानं नाद सोडला. खरं सांगू का तुला ? आपल्यातली ती लग्नं, त्या वराती, ते मानपान आणि तो गोंधळ याचा अगदी उबग आलाय मला'

'पण तुझंही लग्न त्याच पुण्यात त्याच पद्धतीनं झालंय हे विसरलीस वाटतं ?' मी तिला प्रश्न केला.

'विसरेन कशी बाबा ?अगदी सर्व काही संगतवार आठवतंय ! तूही होतास तेव्हा राजनचा जीवश्चकंठश्च मित्र म्हणून रुबावानं मिरवणारा !'

'मित्र काय अजूनही आहेच जिवश्चकंठश्च' मी तिचेच शब्द उच्चारीत म्हणालो.

'हो–हो, फक्त त्याचाच आहेस आणि माझा कुणीसुद्धा नाहीस हेही माहीत आहे मला चांगलं . . . !' ती दुखावलेल्या स्वरात म्हणाली.

तिचे सुस्तावलेले डोळे आणि जडावलेले शब्द ऐकून आजच्या पार्टीत तिला जरा जास्तच झाली होती हे माझ्या लक्षात आलं

**. . . . केवळ सुदैवानंच माझ्या निरपराधीपणाचा पुरावा माझ्या हाती आला रजनी मात्र दोन्ही हातात तोंड झाकून असहाय्यपणे रडत रडत माझ्या पायाशी कोसळली होती . . . .**

होतं; पण तिला अधिक पाघळू न देताच सावरणं मला भाग होतं. एकूण अजूनही राग गेलेला दिसत नव्हता तिचा. त्या वेळच्या प्रसंगानं आणि त्या आठवणीनं पुन्हा एकदा मला अस्वस्थ केलं . . पण लगेच मी स्वतःला सावरलं आणि तिला दटावीत म्हणालो,

'हे पहा रजनी, मी जर तुझा कोणी नसतो तर आज तुला त्या सगळ्या पुरुषोत्तमांतून अलगदपणे बाजूला काढून रात्री तीन वाजता घरी पोचविण्याची तसदी घेतलीच नसती. शक्यतो दुसऱ्या कुणाच्या हाताची पकड तुझ्यावर पडू नये म्हणून सावलीसारखा तुझ्याबरोबर राहिलोच नसतो. तुझ्याबरोबर नाचलोही नसतो. तुझ्या स्पर्शसुखासाठी किती जणात चढाओढ लागली होती आणि तो चान्स घेण्यासाठी– अर्थातच डान्सच्या नावाखाली–कितीजणांनी मी तुझ्याबरोबर नाचत असताना माझ्या पाठीवर टॅप केलं ते फक्त मलाच माहिती ! तरीही फारशी कुणाची दखल न घेता मी तुझ्याबरोबरच राहाण्याचा प्रयत्न केला. राजन आज नाही म्हणून मी तुला सोडू इच्छितच नाही, असाही अर्थ लोकांच्या नजरेत होता, पण त्याचीही मी पर्वा केली नाही. तो कॅप्टन मेहेरा, कमांडर गांगुली, तो ब्रिजनारायण यांनी तर मी बारजवळ उभा असताना, 'Fill her up– and Feel the Difference ! असं सांगून डोळेही मिचकावले. तुला घरी पोचविण्यासाठी तर त्या सगळ्यात स्पर्धाच लागली होती जणू ! आणि मी जेव्हा तुला सगळ्यांदेखत बाहेर काढली, तेव्हा त्यांच्या अर्थपूर्ण आणि मत्सरी नजरा पाहायला हव्या होत्यास तू ! तो रोषही ओढवून घेतला– आणि वाईटपणाही घेतला अगदी निष्काम कर्मयोग्याच्या भावनेनं ! तरीही मी तुझा कोणी नाहीच' . रागानं ॲक्सीलेटरवर पाय दाबीत मी तिच्याकडे पाहात म्हणालो.

'तसा नाही रे माझ्या म्हणण्याचा अर्थ . .'
ती माझ्याकडे वळत म्हणाली. 'तू फारच भावनाप्रधान आहेस–म्हणजे नको इतका . . रजनी माझ्याकडे अर्थपूर्ण पाहात म्हणाली.

'त्याचाही तुला अनुभव आहेच–म्हणजे हवा तितका' मी तिच्या सुरात सांगितलं.

'खरं सांगू का तुला सतीश, मला आज शंकाच होती तू येशील की नाही मला नेण्यासाठी याची ! म्हटलं या कार्तिक स्वामींचा राग गेलाय की नाही अजून ? पण मग मीच फोन करायला सांगितला राजनला निघण्यापूर्वी.

'तू ?'

'होय मीच ! नाहीतर आज प्रश्नच होता मला कंपनी मिळण्याचा !'

'तुला ? आणि कंपनी मिळण्याचा प्रश्न मी मोठ्यानं हसत म्हणालो. हे राजनसमोर बोल. शोभून दिसेल त्यावेळी ! माझ्यासमोर कशाला उगीच हा विनय ? पण ते जाऊ दे . राजनंन फोन केला म्हणूनच मी आलो.' फटकळपणानं मी सांगून टाकलं.

'होय ना ! म्हणूनच तर मी थोड्या वेळापूर्वी म्हणाले तेच खरं आहे की मी तुझी कोणी नाहीच ! नाहीतर गेल्या सबंध महिन्यात तू आल्याशिवाय राहिला नसतास !'

'हं sss. . आलो नाही हे खरंच . पण येण्याचा धीरही होत नव्हता ! तू कसं काय स्वागत करशील याचंच कोडं पडलं होतं मला. एकीकडे मैत्रीच्या कसोटीला जागल्याचं समाधान होतं तर दुसरीकडे मित्राच्या कौटुंबिक सुखात 'प्रामाणिकपणामुळे' विष तर कालविलं नाही ना हीच टोचणी कायम सतावीत होती. तुलाच नव्हे तर राजनला भेटण्याचेही मी टाळत होतो. म्हणूनच राजनचा तुला घेऊन जाण्याबद्दल फोन आला तेव्हा मलाही आश्चर्यच वाटलं !' मी जोरदार वळण घेत म्हणालो.

त्या वळण्यानं बेसावध असलेली रजनी माझ्या अंगावर कलंडली आणि तशीच माझ्या खांद्यावर मान टेकवून विसावली.



अनुक्रमणिका





तिनं घेतलेल्या कॉकटेलचा दर्प मसकन् माझ्या नाकात शिरला.

'Behave yourself Rajani' समोर पाहात एका हातानं तिला नीट बसविण्याचा प्रयत्न करीत मी म्हणालो..

हूंऽऽ अर्धवट हसत रजनी दूर झाली. खरं म्हणजे मी अस्वस्थही झालो होतो आणि चिडलोही होतो. तरीही समोर पाहात मी गाडी हाकीत राहिलो.

'बघ पुन्हा रागावलास क्षुल्लक कारणावरून! आता मला घरी पोचविणार आहेस की रागावून इथेच उतरवणार आहेस?' हसत हसत तिनं विचारलं.

'तुझ्या नवऱ्यानं माझ्यावर जबाबदारी टाकलीय उगाचच! तेव्हा आता जरी तू नाही म्हणालीस तरी सुद्धा मी तुला घरी पोचविणारच—म्हणजे सुटलो. मी स्थितप्रज्ञाच्या स्वरात म्हणालो.

'नाही हूंऽ! नुसतं घरापर्यंत पोचवून जबाबदारी संपली नाही तुझी—वर येऊन कॉफी घेणार असलास तरच घरापर्यंत सोड. नाहीतर मीच सांगते आता की मला इथेच उतरव आणि तू खुशाल तुझ्या घरी जा. माझी मीच जाईन एकटी!' ती हट्टी सुरात म्हणाली.

'You are impossible girl' मी तिच्याकडे न पाहताच पुटपुटलो आणि गाडीचा वेग वाढविला.

'आहेच...' ती वजावीत म्हणाली, 'पण ते जाऊ दे. यापुढे मात्र माझ्याकडे येताना, तुला संकोच वाटण्याचं काहीच कारण नाही. 'Everything is clear now' ती हसत म्हणाली.

'काहीही असलं तरी तो प्रकार घडायलाच नको होता. आणि त्याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे मी तो राजनला सांगायलाही नको होता. पण त्या अनपेक्षित घटनेनंतर माझी उरलीसुरली विचारशक्ती पार संपून गेली होती. त्याला सांगावं तरी पंचाईत आली न सांगावं तरीही पंचाईतच—या द्विधा मनःस्थितीतच माझी झोप पार उडाली. आणि शेवटी काय होईल ते होवो असा मनाचा हिय्या करूनच मी राजनला फोन केला. त्याला घरी बोलाविलं, आधी त्याला ड्रिंक दिलं—मीही घेतलं आणि घडलेला किस्सा मडामडा सांगून टाकून मन मोकळं केलं आणि डोकं हातात धरून बसलो—त्याच्याकडे पाहाण्याचं टाळण्यासाठी' . मी तिच्या घराशी गाडी पार्क करीत म्हणालो.

'वरं मग?' तिनं दार उघडीत विचारलं.

मी गाडी बंद करून चाव्या हातात घेतल्या अ णि दार लॉक करून तिच्याबरोबर पायऱ्या चढू लागलो. अजूनही तिची नशा कायमच होती. लटपटत्या पावलानंच ती मला बिलगली. आणि माझा आधार घेतल्यागत चालू लागली—अगदी लग्नाच्या बायकोसारखी!

चाचपडतच तिनं पर्समधून लॅच की काढली आणि माझ्या दंडाचा आधार घेत ती आत शिरली. मी अधिकच अस्वस्थ झालो.

'वरं मग? पुढे काय?' दिवा लावता लावता तिनं प्रश्न केला.

'पुढे काही नाही. .आधी तू वॉश घेऊन ताजीतवानी हो, मग सांगतो'—मी कोचावर बसत तिला दरडावलं...

'आणि काय रे, नवीन रेकॉर्डिंग कसलं करीत होतीस आज? की स्वतःचंच रेकॉर्डिंग करण्याची लहर लागली होती आज?' तशी हसत हसतच ती बाथरूमकडे वळली आणि मी उगाचच चाळा म्हणून उघडयाच असलेल्या टेप रेकॉर्डरच्या नॉबशी खेळत राहिलो.

दहा पंधरा मिनिटातच ती परतली ती ट्रेमध्ये कॉफीचे कप घेऊनच. अजूनही डोळ्यावरची धुंदी कायम होती आणि चेहेऱ्यावर मिस्किल हासूही होतं!

'वरं मग, पुढे काय झालं?' माझ्या हातात कॉफीचा कप देत रजनीनं विचारलं आणि ती माझ्याशेजारीच बसली.

'हं....तर मी डोकं खाली करून बसलो होतो पुढील संभाव्य घटनांचा आणि राजनवर होणाऱ्या परिणामांचा विचार करीत'.... मी सांगू लागलो. 'पण राजनच्या हसण्यानं आणि माझ्या पाठीवर बसलेल्या थापेनं मी चमकून त्याच्याकडे पाहिलं आणि खरोखरच आश्चर्यचकित झालो!'

'मला हे सर्व माहीत आहे सतीश, तू उगाचच तुझा वेळ आणि तुझी स्कॉच फुकट घालविलीस!' राजन कसंबसं हसू आवरीत म्हणाला.

आणि मी जवळ जवळ हबकलोच. 'म्हणजे हे—हे माहीत आहे तुला? म्हणजे जे काही मी सांगितलं ते?' मी विश्वास न बसल्यासारखा ओरडलो.

'होय अगदी सर्व काही माहीत आहे. रजनीनंच मला सांगितलंय हे जसं घडलं तसं! पण मला हे सर्व तुझ्या तोंडून ऐकायचं होतं. तू जे घडलं ते आपणहून मला सांगशील की रजनीला वाचविण्यासाठी आपल्या मैत्रीचा -प्रामाणिकपणाचाही बळी देशील, हेच पडताळून पाहायचं होतं मला आणि म्हणूनच हे माहीत असल्याची जाणीव मी तुला होऊ दिली नाही.'

'म्हणजे थोडक्यात तू माझी परीक्षा पाहिलीस! तुझ्या मनात कुठे तरी माझ्याबद्दल संशय होता म्हणून. ' मी दुखावलेल्या स्वरात राजनला विचारलं.

'होय. रागावू नकोस पण कधी कधी होतं असं.'

मी अस्वस्थ होईन या शंकेनं तो म्हणाला, 'रजनीला माझ्यापेक्षाही तुझं जास्त कौतुक आहे हे तुलाही माहीत आहे. काहीही कार्यक्रम आखला तरी तुला त्यात घेतल्याशिवाय तो कधीच पुरा होत नाही. माझ्यापेक्षा तुझ्या आवडीनिवडीचीच तिला जास्त दखल असते. तुझी चार-सहा दिवसात फेरी झाली नाही की जास्त चुटपुट तिलाच लागते. या म्हटल्या तर किरकोळ गोष्टी आहेत पण वेगळ्या दृष्टीनं पाहिल्या तर त्यांचा वेगळा अर्थही काढता येतो! पण तुझ्या स्वभावाची मला पूर्ण कल्पना असल्यामुळे मी संशयानं उगाचच पछाडला गेलो नाही आणि आंधळेपणानंही वागलो नाही. तरीसुद्धा कधी कधी मलाही वाटे की तू जरी अगदी जवळचा, अत्यंत विश्वासाचा

मित्र असलास तरी शेवटी तू सुद्धा एक पुरुषच आहेस ! आज तू आपणहून घडलेली हकीकत सांगितलीस आणि तुझं मन मोकळं केलंस, म्हणूनच मीही आडपडदा न ठेवता माझं शल्य तुला सांगितलं. माझ्या मनातील केव्हा तरी ठुसठुसणारा तो संशय पार वितळून गेलाय. आता माझ्या मनात काहीही नाही'. राजन अभिमानानं माझ्याकडे पाहात माझा हात दावीत म्हणाला आणि शीळ वाजवीत बाहेर पडला.

'त्यानंतर तो दूरवरच गेला होता आणि तुला भेटण्याचं मला काहीच कारण नव्हतं म्हणूनच मी जवळजवळ महिनाभर तुझ्याकडे फिरकलोच नाही' मी खुलासा केला.

रजनी गप्पच होती.

'पण अजूनही मला एक कोडं आहे त्याची उकल होत नाहीय ! तू घडला प्रकार राजनला कसा काय सांगितलास ?' मी रजनीला विचारलं.

आणि एकदम ती हसू लागली.

हसता हसता अधिकच माझ्याकडे सरकली

मी जरासा सावरून बसलो.

'राजनला हे सर्व सांगणं भागच होतं मला. . आणि तेही तपशीलवार. . म्हणजे तू त्या दिवशी राजनला भेटायला आलास, पण राजन घरी नव्हता—पार्टीला गेला होता. रात्री तो बऱ्याच उशीरा घरी परतणार होता तरीही मी तुला जेवणाचा आग्रह केला. विशेष आढेवेढे न घेता तू थांबलास. तुझ्या वागण्याबद्दल अधून मधून मला शंका येत असे. माझ्याशी वागताना तुझ्या होणाऱ्या मोकळ्या हालचाली, तुझं मिस्कील बोलणं हे खऱ्याखुऱ्या आणि निर्मळ मनानं होत होतं की त्यामागे माझ्या स्पर्शसुखाची हाव, किंवा माझ्याबद्दलची आसक्तीची भावना होती हे बरेच दिवस मला उमगत नव्हतं. पण ते पडताळून पाहाण्याची मात्र मनापासून इच्छा होती.

"रजनीऽऽ " मी दोन्ही हाताच्या मुठी आवळीत बेभान होऊन रागानं ओरडलोच !!

'असं मी त्याला सांगितलं' ती शांतपणानं म्हणाली. म्हणजे सुरवातीला .आणि त्यामुळेच पुढील भाग—म्हणजे माझं इप्सित साधण्यासाठी मी जे काही प्रयत्न केले ते सर्व—'तुझी परीक्षा पाहाण्यासाठी केलेले तुझ्यावरील प्रयोग'—या सदरात मोडले जाऊन त्याचं महत्त्व राजनच्या लेखी काहीच राहिलं नाही. .क.रण मी तुझी परीक्षाच पाहात होते !' रजनी मोठ्यानं हसत म्हणाली.

माझी अवस्था वेड्यासारखी झाली होती !

'आणि खरी कमाल तर पुढेच आहे.' ती पुन्हा सांगू लागली. 'माझ्या मनात तुझ्याबद्दल निर्माण झालेली ही भावना कळताच तू माझी केलेली निर्भत्सना, माझ्याविषयी दाखविलेला तिरस्कार, माझ्या अनैतिक वागणुकीची तुला आलेली घृणा आणि आपल्या प्रिय मित्राच्या बाबतीत स्वप्नातही प्रतारणा न करण्याचा तुझा निर्धार याचं तुझ्याच शब्दात राजनजवळ मी वर्णन केलं !'

'उद्देश ?' मी कसावसा उद्गारलो.

'उद्देश साधा होता—सरळ होता—घडलेला प्रसंग आज ना उद्या तू राजनला कर्तव्य म्हणून ऐकवणारच याबद्दल मला खात्री होती. तेव्हा तू सांगून त्याचा गैरसमज होण्याऐवजी आणि संसार उधळला जाण्याऐवजी, मघाशी सांगितल्याप्रमाणे मीच तुझी परीक्षा घेतली आणि त्या परीक्षेला तू अगदी १०० टक्के उतरलास असं राजनला मोकळेपणानं दुसऱ्याच दिवशी सांगून टाकलं. व तुझं आदर्श, प्रामाणिक आणि सच्चा मित्राचं स्थान राजनच्या मनात पक्क केलं.' रजनी हसून मला बिलगत म्हणाली !

मी कसाबसा उठून उभा राहात तिला दूर ढकलण्याचा प्रयत्न केला. आणि तीही उठून माझ्याजवळ उभी राहात मला अधिकच बिलगण्याचा प्रयत्न करू लागली.

'R jini again you are out of your sense' तीच दुसरावृत्ती होतेय आज !' असं मी जवळजवळ ओरडूनच तिच्यापासून दूर झालो.

परत जवळ येऊन तिनं माझा दंड पकडला आणि कुत्सितपणानं, पण माझी कीव केल्यागत ती हसू लागली.

'सतीश तुला मूर्ख म्हणू की बावळट म्हणू ? नेभळट म्हणू की षंढ म्हणू ? जिच्यासाठी लोक सर्वस्व टाकायला तयार आहेत ती आपणहून तुझ्या पायाशी येतेय ! तुला कसलीही तोशीस न लागू देता तुझा मार्ग सोपा आणि अगदी सुरक्षित करतेय—तुझ्यासाठी इतके दिवस जीव टाकतेय,

तिलाच तू झिडकारतोस ? दूर सारतोयस ? तिच्या भावनांची काही किंमतच वाटत नाही तुला ?' माझे खांदे गदगदा हलवीत तिनं विचारलं.

'रजनी माझं उत्तर आणि वागणं अजूनही तेच व कायम आहे'. मी निर्विकारपणानं म्हणालो.

'मला काही बंधनं आहेत, काही संस्कार आहेत. मित्राच्या बाबतीत असणारी काही कर्तव्यं आहेत, ती तू धुडकावलीस तरी मला विसरता येत नाहीत'

'पण मलाही तुझ्याबद्दल वाटणारी ओढ, आकर्षण किंवा काय हवं ते म्हण–विसरता येत नाही–विसरणं शक्यच नाही. आजपर्यंत मी कधीच पराभव पत्करला नाही. मला हवी असलेली प्रत्येक गोष्ट मी हवी तशी हवी तितकी मिळविली. ती मिळविताना पाप–पुण्य असल्या गोष्टींचा कधीच विचार केला नाही. त्या दिवशी मात्र तू माझ्याकडे पाठ फिरविलीस आणि मी अधिकच भडकून उठले. माझा पराभव होता तो ! माझ्या इच्छेचा–माझ्या रूपाचाही !

...तेव्हाच मी ठरवून टाकलं, आज ना उद्या पण तुला जिंकूनच दाखवीन. आज ती वेळ मी आणली आहे. राजनचा संपूर्ण विश्वास मिळवून – वाढवून ! त्या वेळी त्याला सांगितलेलं सर्व काही मी आजही सांगू शकते. .अधिकच प्रभावीपणानं, पण शेवटात थोडासाच बदल करून ! जी गोष्ट तू त्यावेळी मनापासून झिडकारलीस, तीच गोष्ट आज, माझ्या विश्वासाचा, एकाकीपणाचा फायदा घेऊन तू बळजबरीनं मिळविलीस असं मी त्याला सहज सांगू शकेन. पार्टीला हजर असलेल्यांनी तुझी माझ्यावरोबर वावरणारी सावलीसारखी साथ पाहिली आहेच ! त्याचा तुझ्या दृष्टीनं चुकीचा परंतु त्यांना अभिप्रेत असलेला अर्थही त्यांनी लावला आहेच. आज ना उद्या इंडायरेक्टली का होईना पण राजनच्या कानावर हे सहजपणे पडणार आहेच ! फक्त तुझ्या व माझ्यावरील विश्वासामुळे त्यात त्याला काहीच वावगं दिसणार नाही. पण जर का मी गोष्टीचा शेवट बदलला, तर राजनचं मनही बदलेल .... कारण कसंही झालं तरी राजनची मी बायको आहे. आणि असल्या बाबतीत तुम्ही पुरुष फार हलक्या कानाचे आणि त्याहूनही फार हळव्या मनाचे असता'... रजनी माझ्या कानाजवळ तोंड नेत म्हणाली.

मी असहाय्यपणे तोंड फिरवून मागे टेबलाजवळ गेलो, आणि नकळतच रागारागानं 'खट्‌दिशी' नॉब दाबला. जणू स्वतःवरचा रागच दुसऱ्या कशावर तरी काढावा तसाच...आणि अचानक टेप थांबल्याचं माझ्या लक्षात आलं !

अचानक विजेचा दिवा लागावा तसा माझ्या डोक्यात चक्क उजेड पडला !

आणि मी विजेच्याच चपळाईनं त्या रेकॉर्डरमधली टेप हातात घेतली...

माझ्या निरपराधीपणाचा पुरावाच अचानक हाती आला होता!

आणि क्षणार्धातच ही गोष्ट लक्षात आल्यावर रजनी दोन्ही हातात तोंड झाकून असहाय्यपणे रडत माझ्याच पायाशी कोसळली होती...

●

[ पान १८ वरून- **सुपारीनं...** ]

असिजा पितापुत्रांचे खून केल्यानंतर हे दोघेही आरोपी मालवाहतुकीचा धंदा करून पैसे मिळवीत होते. त्यासंबंधीचा तपास करणे आवश्यक होते. कर्नेलसिंगाकडे गिरिधरलालांचे चेकबुक मिळाले होते. कदाचित् गिरिधरलालांच्या अंगावरील इतर काही वस्तू त्याने लुबाडल्या असल्याची शक्यता होती. यासंबंधी कर्नेलसिंगाला पुनः विचारताच, गिरिधरलालचे पैशाचे पाकीट व मनगटावरील घड्याळ आपण काढून घेतल्याचे त्याने कबूल केले. ते घड्याळ आपण नांदेड येथील नगीना घाटाजवळील गुरुद्वारातील एक सेवेकरी प्रीतमसिंग ताहेलसिंग यास भेट दिल्याचे कर्नेलसिंगाने सांगितले. बारा डिसेंबरला कर्नेलसिंगास नांदेड येथे नेण्यात आले. त्याने प्रीतमसिंगची आणि पोलिसांची गाठ घालून दिली. प्रीतमसिंगाने आपल्या जबानीत ते घड्याळ कर्नेलसिंगाने भेट म्हणून दिल्याचे सांगितले व ते घड्याळ पोलीसांच्या ताब्यात दिले. गुन्हा झाल्यानंतर थोड्याच दिवसात दसऱ्याच्या उत्सवासाठी दोघेही आरोपी नांदेडला गेले होते. त्यावेळी कर्नेलसिगाने ते प्रीतमसिंगाला नजर केले होते. या घड्याळाची ओळख श्रीमती असिजा यांना पटली.

कलमेश्वर येथे सल्फेटची पोती पोचविल्यानंतर दुसरे एक भाडे घेऊन दोन्ही आरोपी मुंबईस परतले होते. मुंबईतून त्यांना पुनः दक्षिणेकडचे भाडे मिळाले. माल घेऊन ते मंगळूरला गेले. मंगळूरला कृष्णप्रसाद ट्रान्सपोर्ट कंपनीच्या द्वारा भिकाभाई प्रभुदास कंपनीचे सुपारीचे भाडे त्यांना मिळाले. सुपारीच्या एकशे एकसष्ट गोण्या ट्रकमध्ये चढवून ते चौदा ऑक्टोबर रोजी मुंबईस येण्यास निघाले. असिजांची ट्रक म्हणजे सोन्याचे अंडे घालणारी कोंबडीच मिळाली होती. त्यांना आता पैशाची ऊब आली होती. गिरिधरलाल आणि अरुणकुमार यांना सफाईने मारून टाकण्यात त्यांना विलक्षण यश आले होते. त्याचा उन्मादही त्यांना चढला होता. आता सोन्याचे अंडे घालणारी कोंबडीच कापायला ते उत्सुक झाले होते. आता मालवाहतुकीचा धंदा तरी कशाला नेकीने चालवा ? जगात प्रामाणिकपणे राहून काही मिळत नाही ! असा विचार त्यांच्या मनात बळावला असावा. म्हणून मुंबईस येताच त्यांच्या मनाने पलटी खाल्ली व माल गुजरातेत पोचविण्याऐवजी मुंबईतच खपवून ट्रकसहित पोबारा करण्याचे त्यांनी ठरविले.

मुंबईस येताच त्यांनी आपल्या ओळखीच्या हस्तकांकरवी जे. किशन आणि कंपनी या मेडिकल स्टोअर्सच्या मालकाला म्हणजे गोविंदराम शोभराज याला सर्व सुपारी तीस हजाराला विकून टाकली. या कामी त्यांना चुनीलाल, सीताराम व बजनसिंग यांची मदत झाली होती. सुरवातीला त्यांना दहा हजार मिळाले. नंतर गोविंदरामने पुनः पंधरा हजार दिले. पण पैशाच्या वाटपावरून कर्नेलसिंग आणि सुरजितसिंग यांचे भांडण लागले. शेवटी सीताराम व चुनीलाल यांनी मध्ये पडून भांडण मिटविले. सुरजितला आणखी चार हजार रुपये द्यावयाचे आणि ट्रक कर्नेलसिंगाने आपल्याकडे ठेवायचा अशी तडजोड ठरली. आपल्या हिश्शाचे पैसे घेऊन सुरजितसिंग हरयानाकडे निघून गला होता. कर्नेलसिंग मात्र पुनः माल वाहतुकीचा धंदा






करण्यासाठी ट्रक घेऊन गावोगाव हिंडू लागला. सुपारीच्या रकमेपैकी आणखी रक्कम अद्याप वसूल व्हावयाची होती.

कर्नेलसिगने आता आपल्या ट्रकवर एक ड्रायव्हर नेमला. वजनसिंगाला त्याने क्लीनर म्हणून नेमले आणि ट्रक मालकाच्या थाटात तो नासिक, लासलगाव या भागांमध्य हिंडू लागला. नऊ नोव्हेंबर रोजी नासिक व लासलगांव येथील कांदा भरून इंदूरला पोचविण्याचे भाडे मिळाले. ट्रकमध्ये कांदा भरून घेऊन तो इंदूरला जाण्यासाठी दहा नोव्हेंबरला निघाला. त्यापूर्वी एकद इंदूरची ट्रिप झालीच होती. पहिल्या ट्रीपच्या वेळी त्यान ट्रकची थोडी दुरुस्ती करून घतली होती व इंदूरच्या एका कारखान्यात ट्रकचा हौदाही बदलून घेतला होता. या दुसऱ्या ट्रिपच्या वेळी मात्र त्याचे दुदव आड आले. इंदूरला पोचण्याआधीच व टेत सेंघवा या गावी ट्रॅफिक पोलीसने त्याला अडविले. त्याच्याजवळ मध्यप्रदेशाचा वाहतूक परवाना नव्हता. म्हणून पोलीसांनी ट्रक ताब्यात घेतला. परमीट काढण्यासाठी मुंबईस येणे कर्नेलला भाग होते. शिवाय सुपारीचे बाकी पैसेही वसूल व्हावयाचे होते. म्हणून तो तडक मुंबईस वजनसिंगसह परतला. तो अकरा नोव्हेंबर रोजी मुंबईस आला. शीव–कोळीवाडा येथे चुनीलालकडे दोन परके इसम आल्याची बातमी चाणाक्ष शिपायाने दिली होती. हे परके इसम दुसरे तिसरे कोणी नसून कर्नेलसिगच आणि वजनसिंग होते.

पोलीसांनी आपल्या पुढील तपासात इंदूर, सेंधवा, नासिक, लासलगाव येथील साक्षीदारांच्या जबान्या घेतल्या. थळघाटातील सांगाडे मानवीच आहेत यासंबंधीचा रिपोर्ट जे. जे. हॉस्पिटलच्या अस्थितज्ज्ञाकडून आला होता. कपड्यावरच्या व चपलावरच्या रक्ताच्या डागासंबंधीचा रिपोर्टही केमिकल अनलायझरकडून आला होता. पुरावा गोळा करण्याचे काम आता संपले होते. गिरिधरलाल आणि अरुणकुमार यांचा खून करून त्यांच्या मालमत्तेचा अपहार करण्याचा कट करण्याबद्दल, जबरी चोरी केल्याबद्दल, खून केल्याबद्दल, खून झाल्यानंतर मयतांची मिळकत वारसांना मिळण्याऐवजी तिचा आरोपींनी अपहार केल्याबद्दल, असे एकंदर चार आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आले होते. खटला मुंबईच्या सेशनकोर्टात रीतसर कमिट झाला. सत्र न्यायाधीश श्री. तळाशीकर यांच्यापुढे खटला सुनावणीस निघाला.

सारा पुरावा परिस्थितीजन्य होता. पण पुराव्यातील दुव्यांची साखळी बरोबर जमत होती. फिर्यादीपक्षातर्फे एकूण बेचाळीस साक्षीदार तपासण्यात आले. सरकारतर्फे मांडण्यात आलेला पुरावा न्यायाधीशांनी ग्राह्य मानला. खुनाच्या आरोपाबद्दल दोन्ही आरोपींना जन्मठेपीच्या शिक्षा सुनावल्या. शिवाय खून वगैरे गुन्ह्यांचा कट केल्याबद्दल प्रत्येकास तीन वर्षे सक्तमजुरी, पाचशे रुपये दंड (तो न भरल्यास पुनः सहा महिने सक्तमजुरी); जबरी चोरी केल्याबद्दल प्रत्येकी तीन वर्षे सक्तमजुरी, एक हजार रुपये दंड. (दंड न दिल्यास पुनः सहा महिने सक्तमजुरी); मयताच्या मिळकतीचा अपहार केल्याबद्दल पाच वर्षे सक्तमजुरी, पंधराशे रुपये दंड (दंड न दिल्यास पुनः सहा महिने सक्तमजुरी) अशा इतर शिक्षाही न्यायाधीशांनी ठोठावल्या. या सर्व शिक्षा आरोपींनी एकदम भोगावयाच्या होत्या !

● ● ●




एक करुणरम्य समाजकथा

**"....प्रेम आणि लाचारी एकत्र नांदत नाहीत, प्लीज गो !" त्याचा चेहेरा कोमेजला—माझ्याकडे पाठ फिरवून तो पाताळ धुंदीत चालू लागला ....**

—रवींद्र पिंगे



साडेपाच वाजले. दफ्तरं आवरून मंडळी घरोघर पांगली. फक्त मीच तेवढा मागे रेंगाळलो. घरी परतण्याची मला घाई नव्हती. वटवाघुळांसारखा अखंड कलकलाट करणारं आमचं रेडिओ हपीस सायंकाळ कलू लागली तसतसं नदीकाठासारखं शांत शांत होऊ लागलं. शांततेच्या त्या प्रदीर्घ किनाऱ्यावर मी एकटाच उरलो. मनावर कामाचा कसलाच ताण नव्हता म्हणून खुर्चीत रेलून बसलो. बुटाच्या वाद्या सैल केल्या. टायची चिकटपट्टी काढून ठेवली. खिडक्यांमधून पलीकडल्या इमारतींची बलदंड छाताडं दिसत होती, ती पाहू लागलो. शेजारची सचिवालयाची अजस्र गढी तर सुरक्षित सत्तेची साक्षात् वज्रमूठच होती. रस्त्याला लागून तळाला कल्लेवाल्या धनाढय राजाची हमी लाभलेली बँक होती. तिच्यातला माझा अडका पूर्णपणे सुरक्षित होता. मी बसलो होतो तिथून रेजे घालून सुरक्षित केलेला कॅशियरचा पिंजरा दिसत होता. त्याच पिंजऱ्यात ठेवलेली भक्कम तिजोरीही दिसत होती. माझ्या नि इतरांच्या पुढच्या पगाराच्या दिडक्या तिच्यात सुरक्षित होत्या. तो सर्व परिसर सुरक्षित होता नि मीही बुलंद बुरुजासारखा तिथे सुरक्षित होतो. भिंतीलगतच्या शिसवी घडवंच्यांवर माझी हस्तलिखितं धूळ खात होती. खरं तर तो उदंड रटाळ लिखाणाचा खजिनाच होता पण त्याचं वातड नि बेचव रूप दृष्टीआड सारून तोंडदेखली स्तुती पेरणाऱ्या स्नेहीजनांनी माझ्यासभोवार सुरक्षिततेचं अभेद्य कवच उभं केलं होतं. त्या परिसरातला मी एक बिंदूच होतो. मात्र खिरापत वाटू शकणारा, सत्तेच्या सागरातला बिंदू असल्यामुळे, मी निर्धास्त होतो. आजुबाजूला पाहावं तिकडे मला माझी सुरक्षितता दिसू लागली. पूर्ण सुरक्षिततेच्या भावनेची एक लाट माझ्या अंगांगावर फुटली. जरा हुरूप वाटला म्हणून समोरचे कोरे कागद पुढे ओढले. सपासप संवाद लिहू लागलो. त्यात माझी तंद्री लागली. इतक्यात मागून कुणीतरी ओळखीच्या आवाजात हाक मारली,

"काय राव, आहात का ? नाही, म्हटलं इतका उशीरपर्यंत बसून कुणावर इम्प्रेशन मारताय ?"






मी चमकून मागे पाहीलं. खादीचा सैलसर खमीस घातलेला नाना परचुरे दारातून माझ्याकडे पहात तोंडभर हसत होता. जवळ-जवळ पाच सहा वर्षांनी मी त्याला पहात होतो. त्याच्यात कसलाच बदल झालेला दिसला नाही. उठण्याची तकलीफ न घेता बसल्या बसल्याच त्याच्याशी हस्तांदोलन करून मी म्हटलं,

"लेका नान्या, किती वर्षांनी उगवलास?"

त्यावर प्रथम काहीच न बोलता त्यानं आपली गच्च भरलेली पोतडी माझ्या मेजावर ठेवली आणि तिच्याकडे बोट दाखवीत तो हसत हसत म्हणाला,

"ही पोतडी बघून मी आल्याचा कुणाला आनंद होत नाही. कारण तिच्यात कुठल्या ना कुठल्या फंडाची पावती बुकं असणार हे लोक गृहीतच धरतात!"

"चालेल रे बाबा! घेऊ आपण एखादं तिकीट; पण त्याहीपेक्षा तू भेटल्याचा आनंद अधिक आहे. बैस; काय म्हणतोस?"

"खरंच आनंद झाला माझ्या भेटीचा?" त्यानं विचारलं.

"कां? शंका वाटते?"

"जरूर! आजकाल तुम्ही सावरलेले लोक फार दांभिक बोलायला लागलाय; पण ते असू दे. मी तुला आल्या आल्याच आनंदाची बातमी सांगतो."

"मग ती अगोदरच नाही का सांगायचीस?"

"आनंदाची बातमी अशी की आज मी कुठलीही पावती बुकं आणलेली नाहीत! तेव्हा मित्रा, तू अगदी निर्धास्त अस."

मी मनापासून हसलो. त्यावर तो मिष्कीलपणे म्हणाला,

"आता तू माझा पंचनामा करू शकतोस!"

"म्हणजे?"

"म्हणजे तू आता शिष्टपणाने मी सध्या काय करतो, कुठे राहतो, जेवतो, शाखेवर जातो की नाही, देशाचं मलं चाललंय ना, यंदा शिबीर कुठं आहे, वगैरे प्रश्नांचा भडीमार कर नि स्वतःकडे सामाजिक बडी-लकी ओढून घे. बाबा, कितीही झालं तरी तू एस्टॅब्लिशमेंटचा माणूस आहेस!"

त्याच्या उपरोधाचा अर्थ आणि अन्वय मला कळला. नाना नि मी दलात एकत्र होतो. पोटभर खस्ता काढत काढत आम्ही दलातच वाढलो. शिबिरातल्या शाखासैनिकांसाठी भायखाळ्याच्या मार्केटात भाजी जमवणं, ते गोण पाठीवरून वाहून नेणं, नेत्याची जाजमं झट-कणं, उदबत्त्या विकणं वगैरे सेवाकर्म आम्ही वर्षोन् वर्षं केलं. खरं तर दलाच्या आम्ही सीता-सावित्रीच होतो! पण पुढे माझं पतन झालं. सावध होऊन मी पोटापाण्याला लागलो. प्रपंच केला. नाना व्रतीच राहिला. प्रत्येक शिबिराचा रसोडा आमच्याकडे असायचा. रात्री मुलांची निजानीज झाल्यावर कोरड्या भाकऱ्या आम्ही कांद्याबरोबर, गाजरांबरोबर खायचे आणि वर पाण्याचे लोटे ढोसून सेनापतींना मनातल्या मनात प्रणाम करीत करीत गहींवरून झोपी जायचे. ते तल्फी दिवस माझ्या मनासमोरून क्षणात झळाळून गेले. मी अपराधी स्वरात म्हणालो.

"सगळं खरं रे, पण आता व्यापताप इतके वाढले आहेत की इच्छा असूनही जुन्या मंडळींना भेटता येत नाही. आणि भेटणार तरी कुठं? शिवाय काळही बदलला आहे."

"नि शिवाय तुमची दोंदंही वाढली आहेत! पण असो; ती हट-वणं हे काही आमचं अवतार कृत्यं नव्हे. बरं, आता मी कशासाठी आलो असेन ओळख पाहू? पावती पुस्तकं आणलेली नाहीत हे मी आधीच सांगितलंय."

"माझं कुठं तरी मापण ठेवायचं असणार. दुसरं काय?

"छ्या!" झुरळ झटकावं तसं माझे शब्द झटकीत तो म्हणाला, "भेटेल त्याला अंगारा लावण्याचं ते काम आपण सोडून दिलं, राव."

"मग कदाचित तू सचिवालयात आला असशील नि वेळ मिळाला तसा इकडे वळलास."

"साफ चूक. सचिवालयाचा रहाट कोण ओढणार? आपण तर बाबा हात टेकले! फालतू कामासाठी सुद्धा मंत्री लोक तीन तीन वर्षं घोळ घालतात. खेटे मारत ठेवतात. नंतर मोघम आश्वासनं देतात नि तुम्ही जरा कुठं नेट लावता न लावता, तोपर्यंत त्या लेका-च्यांचा खातेपालट होतो! की पुन्हा नव्या माणसाजवळ नमनाचं घडाभर तेल जाळावं लागतं. त्यापेक्षा पब्लीक कॉन्टॅक्ट बरा. म्हणून तर तुझ्याकडे आलो. बारकसं काम आहे माझं तुझ्याकडे. करशील?

"अगदी आनंदाने करतो. बोल."

"मला लताचा एक कार्यक्रम स्वस्त्यात ठरवून दे; तर तू खरा."

मी हादरलो. थक्क होऊन विचारलं,

"काय पण काम काढलंस!"

"कां? त्यात नर्व्हस होण्यासारखं काय आहे? रेडियोवाले तुम्ही लोक; इतकी पत नाही तुमची तिच्याकडे?"

"छे रे नान्या; कुठे लता नि कुठे आम्ही! नि समजा, की ती आहे आमच्या दोस्तान्यातली – तरीसुद्धा तिचा कार्यक्रम कसा काय ठरवून द्यायचा बाबा? इटस् आलमोस्ट इम्पॉसिबल!"

"कां इम्पॉसिबल असावं? कार्यक्रम काही मला माझ्या मुलाच्या मुंजीसाठी नकोय. झोपडपट्टीवाल्यांसाठी आम्ही दवाखाना सुरू कर-णार आहोत धारावी ब्रिजला. त्यासाठी पैसे हवेत. कंट्री पिऊन पिऊन नि ओलीत राहून राहून त्या लं.कांचे प्राण जायची वेळ आल्याय. हीच वेळ आहे."

"जाऊ दे रे. हेही दिवस जातील. तशात दवाखाने वगैरे म्युनिसिपाल्टीचे काम आहे. तू कशाला जीव आटवतोस?"

"मग दलात असताना ताडदेवपासनं फणसवाडीपर्यंत आपण जी सालोसाल गटारं झाडली, त्यावेळी तू का नाही सेनापतींना ठण-कावून सांगितलंस की बॉ तात्या, गटारसफाई हे म्युनिसिपाल्टीचं काम आहे; आम्ही नाही आमचा जीव आटवणार" मग क्षणभर विचार करून परचुरे तुच्छतेच्या स्वरात म्हणाला, "ती पांढरपेशांची नि विशे-षतः बामणांची गटारं होती! धारावी म्हणजे अक्करमाशांचा मोहल्ला. तिथे आईस आहे त्याला बापूस नाही नि बापूस आहे त्याला आईस नाही. सो दॅट इज नोबॉडीज कमिटमेंट!"








"तू इतकं ताणू नकोस नान्या; पण माझ्याच्यानं आता असली कामं धकत नाहीत. त्यापेक्षा तुझ्या कामाचे चार लेख लिहायला सांग मला. मी आनंदाने लिहीन." मी अजिजीनं सुचवलं.

"म्हणजे तुझ्याही पोटातलं पाणी हालायला नको नि वाचणाऱ्याऱ्याही पोटातलं पाणी हालायला नको ! शाब्बास ! काय मजा आहे बघ पिग्या, इतक्या लोकांना भेटलो मी, पण एका फद्याची लताकडे फ्न नाही ! थू:" त्यानं खरं खरं सांगून टाकलं.

"शी इज टू हाय !"

"आणि ती सोडून इतर सगळे टू लो आहेत ! काय रे, माणूस बूटसूटवाला झाला की त्याचा सेन्स ऑफ कमिटमेंट अजिवात नाहीसा होतो काय रे ?"

"तुझे निष्कर्ष तू काढ; पण एक गोष्ट सांगतो नान्या; तू जर माझ्यासारखा प्रापंचिक झालास तर असल्या कामावरचं तुझंही लक्ष उडेल. त्यातून चाळीशी ओलांडल्यावर तर सगळाच वाजा वंद होईल लिहून ठेव माझे शब्द."

"चागला आशिवाद देतो आहेस !"

"तुझ्याच भल्यासाठी तो फळू दे. समाजाचं काय मोठ्ठसं ?" आपापल्या प्रारब्धाप्रमाणे तो जगायचा तितका जगतो नि मरायचा तेव्हा मरतो. अमेरिकन्सही जगताहेत, आदिवासीही जगताहेत. नि मरायचे होते तेव्हा, ग्रीक्सही मेले नि आर्यही लयास गेले तेव्हा यू डोन्ट वरी. तू तुझ्या पायाखालची जमीन वघ"

"आणि काय करू ?"

"प्रापंचिक हो ! देअर इज नो सबस्टीटयूट फॉर मॅरीड लाईफ."

"अगदी वेदवाक्य का ?"

"शंकाच नाही."

"अच्छा. तुझा प्रपंच केवढा आहे ?"

"एक बायको, दोन मुलं."

"असोत ! दोन बायका नि एक मूल असण्यापेक्षा परवडलं !"

"म्हणजे ?" मी चक्रावून विचारलं.




७२ चे स्वप्न !

'थांबा, जंतेच्या पाठिंब्याने सद्याचे सरकार पाडून टाकूं'

"ते जाऊ दे. तुझं लग्न केव्हा झालं ?"

"झाली चार वर्षं."

"हां–हां ! आता आठवलं. तुझ्या लग्नावर लंडन टाईम्सने अग्रलेख लिहिला होता नाही का ? केवढी बहादूरी करता रे तुम्ही लोक लग्न करता म्हणजे !"

"तू प्रयत्न कर. तुलाही जमेल तितपत बहादुरी."

"असं म्हणतोस ?"

"नुसतं म्हणत नाही. रेकमेंडही करतो. बरं, चहा घेऊ या ?"

"हा शेवटचा प्रश्नच काय तो सत्य आहे ! चल. लताच्या-आवाजाखालोखाल आपलं गाढ प्रेम चहावरच आहे."

आम्ही खाली कॅंटीननामक मटारखान्यात आलो. मी चहाची वर्दी दिली. त्यावर नाराजी व्यक्त करीत परचुरे म्हणाला,

"नो प्लीज. चहा मला प्यार आहे; पण म्हणून काय तो दिवसभर ढोसायचा ? मला आईस्क्रीम हवंय. तुम्हा एस्टॅब्लिशड् लोकांची ही रीतच आहे लेको. गोड गोड बोलायचं; ढुंगणसुद्धा हलवायचं नाही; थोडसं उपदेशामृत शिंपडायचं नि आऊटसायडर हा जन्मभर आऊटसायडरच राहील अशा शिताफीने त्याला सिंगल गरग पाण्याच्या घोटावर कटवायचं; पण लक्षात ठेव पिग्या ह्या बाबतीत मी तुम्हा सर्वांचा वा लागून राहिलोय !"

"अरे, पण ह्या माण्याची काही आवश्यकता तरी आहे का ? तू सरळ सरळ आईस्क्रीम मागू शकतोस की. फॉर गाडस् सेक, तू असं परक्यासारखं वागू नकोस बॉ. मग मलाच अवघडल्यासारखं होतं."

"ते सगळं खरं रे; पण खास आमचे म्हणून काही योग आहेत नं. त्यांचं काय ?" मग स्वत:शीच खंगलेलं हसू करीत तो म्हणाला, "मागितल्याशिवाय आम्हाला फत्रेसुद्धा मिळणार नाहीत !"

"तुम्ही लोक सगळं काल्पनिक दुखणं ओढवून घेताय्"

"नाही; आमचा अनुभवच तसा आहे. हाच जर माझ्या ठिकाणी एखादा कंडा माल असता, तर तू तिला आग्रह कर करून क्रीमसेंटरमध्ये नलं असतंस; च्याऊमाऊ केलं असतंस; पण आम्ही पडलो हे असे फटींग. ना घरके, ना घाटके."

"हे आणखी दुसरं काल्पनिक दु:ख ! तू कशाने न घरका, न घाटका? तू आमचाच आहेस. मी आता उपनगरात फर्स्ट क्लास फ्लॅट घेतलाय. तू अधूनमधून येत जा पंक्तीला माझ्य कडे."

"ती पुढची गोष्ट झाली. आजच्या आईस्क्रीमचं बोल."

"तू भारीच बॉ चिवट ! चल, आपण क्रीमसेंटरमध्ये जाऊया"

मी दफ्तर आवरलं. परचुरेला घेऊन क्रीमसेंटरमध्ये आलो. समोर पाहीलं तर भींतींना चहूबाजूंनी मारलेल्या आरशात मला परचुरेची अनेक रूपं दिसू लागली ती मजेदार प्रतिबिंब–मालिका न्याहाळीत मी आईस्क्रीमची ऑर्डर दिली. बशा आल्या. क्रीम खात खात नाना म्हणाला,

"तू खरा नशिबवान !"

"कसा काय ?"







अनुक्रमणिका

"करायची तेव्हा तू स्वयंसेवकगिरीही केलीस, नि आता करायची तेव्हा पेट्रनकीही करतोयस."

"बशीभर आईस्क्रीम तुला दिलं, ह्यात कसली पेट्रनकी केली मी?"

"स्वरूप लहान असेल, पण जातकुळी एकच आहे; पण एक लक्षात ठेव राजा, एक दिवस झोपडपट्टीवाले तुमच्या पॅन्टी काढून घेणार आहेत !"

"घेतील तेव्हा घेतील. तोपर्यंत आपण पोटभर खाऊन घेऊं या." मी त्याचं लक्ष दुसरीकडे वेवण्यासाठी म्हटलं; पण तो मला स्थिर नजरेनं निरखीत होता.

"ह्या टाय केव्हढ्याला घेतलास ?" त्यानं विचारलं.

"घेतला नाही. एकानं प्रेझेंट दिलाय." मी सांगितलं.

"एकानं की एकीनं ?"

"एक.नंच बाबा. एकीकडूनही प्रेझेंटस् मिळतात, पण ती योगाची बाब आहे. शिवाय त्याचं स्वरूप इतकं गद्य नसतं." मी त्याला खुलवायचा प्रयत्न केला.

"ही आणखी दुसरी मजा आहे तुम्हा लोकांची ! एस्टॅब्लिशड् माणूस, मग तो बुवा असो नाहीतर बाई असो, एस्टॅब्लिशड माणसालाच प्रेझेंटस् देणार. मग तो टाय असो, फाऊंटनपेन असो, रुमाल असो की फॅमिली रूममध्ये दिलेला मुका असो !"

"अरे, आम्ही कुठे एवढे भाग्यवान आहोत ?"

"सगळेच भाग्यवान असं उफराटं बोलतात. तुम्ही करीयरवाल्या लोकांनी सध्या एक नवंच ब्राह्मण्य सुरू केलंय. फक्त एस्टॅब्लिशड तो तुमचा. उरलेले सगळे तुमच्या हिशोबी आऊटसायडर्स; बैरागी."

"माझं तर म्हणणं उलटं आहे. तुम्ही गोसाव्यांनी एक नवाच सत्यशोधकपणा सुरू केलाय ! ऊठ-सूठ सर्वांना करीयरीस्ट नि एस्टॅब्लिशड म्हणून हिणवायचा. आम्ही नोकरी करतोय हाच आमचा गुन्हा झालाय ! पण ते मरो. आईस्क्रीम तर चापूया."

क्रीम विलक्षण मिष्ट होतं. विषय बदलावा म्हणून मी म्हटलं, "कशी आहे चव ? मस्त ?"

"अशा मागून घेतलेल्या आईस्क्रीमची चव जितपत गोड असायची तितपत आहे. तू माझा पेट्रन आहेस. त्यामुळ मुदलात असेल त्यापेक्षा तुला मात्र ते अधिक गोड लागत असेल." परचुरे थंडपणे बोलला. मी खट्टावलो.

"काल रात्री तू कार्ल्याची भाजी खाल्लेली दिसत्येय. जिभेवर कडवटपणा राहीलाय म्हणून विचारलं" मी विचारलं.

"जसे ज्याचे अनुभव, तशी त्याची भाषा." त्यानं ठामपणे उत्तर दिलं.

"नान्या, तुझा हितचिंतक म्हणून तुला सांगतो, तू एखादी साधी सरळ नोकरी बघ. दल-बिल सगळं फुकट आहे. पूर्वी ठीक होतं. स्वस्ताई होती. लोकांची कामं करणाऱ्याला समाजात मान होता. आता काय उरलंय ? नि एस्टॅब्लिशमेंटच्या दानावर जगणाऱ्या स्वयंसेवक संघटना फुलटायमर्सना काय देणार ? खरं सुख कशात आहे ते तुम्हा लोकांना धड कळलेलं नाही."

"पण माझं मरण मी आपखुषीनं पत्करलेलं असलं तर ?"

"प्रश्न आज मानाने कसं जगायचं हा आहे. मरणाचा नाही. ते येईल तेव्हा येईल. दरम्यानच्या काळात जगणं मात्र बोकांडी बसलं. त्याबद्दल बोल."

"माझं मरण मी नीट पाहिलंय. माझ्या जगण्या-मरण्याची मी किंमत मोजतोय. त्यालासुद्धा हिंमत लागते.

मी निरुत्तर झालो. त्यावर बशी संपवीत तो म्हणाला,

"आणखी एक प्लेट मागव.

मी पुन्हा वर्दी दिली. नव्या प्लेटचा तो फडशा उडवू लागला.

"तू कधी तरी ये की रे माझ्या फ्लॅटवर." तो क्रीमशी तद्रूप होत मलाच म्हणाला.

"काय बोलतोस काय नान्या ! तुझा फ्लॅट आहे ?"

"कां ? असू नये ?"

"असावा रे; पण तुला परवडतं कसं ?"

"अनेक गोष्टी असू शकतात. मी दरम्यानच्या काळात श्रीमंताची लेक पटकावलेली असणं शक्य आहे; मी फावल्या वेळात गृहसजावटीचा खाजगी धंदा करीत असणं शक्य आहे; मी नाटकांचे प्रयोग कॉंट्रॅक्टस्नी घेत असणं शक्य आहे; मी मेकअप सर्वीस सुरू केलेली असणं शक्य आहे. किंवा, ह्या सगळ्याच गोष्टी मी एकाच वेळी करीत असणंही शक्य आहे."

"ह्याचा अर्थ तू बनेल आहेस ! नि समाजसेवा वगैरे तुझा मुखवटा आहे."








"कसा ?"

"कारण तूही तुझी करीयरच केली आहेस. फरक एवढाच की समाजसेवेच्या कुंकवाआड तुझं सर्व चाललंय. दलातला म्हणून भाव खायचा, तिथला पगार घ्यायचा, काँटॅक्टस् वाढवायचे नि मुखवटेबाजीचे सगळे आनुषंगिक फायदे अलगद उठवायचे. व्हॉट ए ब्रिलीयंट मॅन यू आर !"

"आणि समजा, फावल्या वेळात मी माझ्या अक्कलहुशारीने चार दिडक्या मिळवीत असलो नि संस्थेच्या हलाखीच्या स्थितीत तिच्यावर बोजा नको म्हणून तिथली एकही पै न घेता तिचं काम व्रत मानन निरलसपणे करीत असलो तर ? असेही असणं शक्य आहे. नाही का ? माणूस एकाच वेळी कर्तृत्ववान नि वैरागी असणं अशक्य आहे ?"

"म्हणजे तुझी पोझिशन नक्की काय आहे ?" मी गोंधळून विचारलं

"सत्याला भिडणारा मार्ग हा असा गुंतागुंतीचा असतो बाबा !"

मी चक्रावलो. परचुरेने दुसरी प्लेट संपवीत आणली होती. एकाच नाना परचुऱ्याची मला नाना रूपं दिसत होती. सुरक्षित प्रस्थापितांच्या अभेद्य बुरुजावरोवर टक्कर देऊ इच्छिणारा संतप्त पण दुवळा परचुरे, समाजसेवेच्या मुखवटयाआडून गब्रू होत चाललेला नटवर्य परचुरे, दुसऱ्याच्या दानावर हक्क शावीत करणारा लाचार परचुरे; आपले हुन्नर राववून खंगलेल्या संस्थेवर भार न टाकणारा त्यागी, व्रती परचुरे; मांजलेला, मथवलेला, मावळलेला, भुकेलेला आणि भेगाळलेला नाना परचुरे; मोळाभावडा ओवडधोवड, खर्ची पडलेला साधासुधा सात्विक परचुरे !

"आणखी एक प्लेट मागव वॉ". त्यानं लाचारीची गुळणी गालात धरून विनंती केली. मान्य करणं मला भागच होतं. तिसरी प्लेट तो सपासप चापू लागला. मी त्याच्याकडे पाहू लागलो. ते त्याच्या लक्षात आलं. त्यानं विचारलं,

"इतकं रोखून काय पाहतोस ?"

"अरे, तुला इतकी भूक लागली होती तर तसं कां नाही सांगितलंस आधी ? आपण छानपैकी खाणंच मागवलं असतं." मी म्हटलं.

"भुकेचा प्रश्नच नाही. मला असं सपाटून आईस्क्रीम खायचीच सवय आहे." त्यानं सांगितलं. मी थक्क झालो. तो आइस्क्रीमचा एक तुकडा गिळत म्हणाला, "आता ही प्लेट संपली की मी चौथी मागवणार ! मागव ना ?"

पण माझ्या अनुमतीची वाट न पाहताच त्यानं स्वतःच फक्त स्वतःसाठी चौथी प्लेट मागवली. ती चापायला सुरूवात केली.

"तू ही महागडी सवय कुठं लावून घेतलीस ?" मी सुन्नपणे विचारलं.

"त्याचे प्रयास पडले नाहीत. कुठंही गेलो तरी एस्टॅब्लिशमेंटवाले पेट्रनची भूमिका घेऊन आईस्क्रीम देतातच. फक्त तोंड वेंगाडावं लागतं. पण मी विचार केला की आपण जर देशासाठी इतकं रक्त आटवतो तर जाता जाता पेट्रन्सना ओरबाडून असली मामुली सुखं तरी वेदिक्कत कनवटीला लावावीत. आय एन्जॉय आईस्क्रीम !" शेवटचं वाक्य उच्चारताना त्यानं आनंदाने डोळे विस्फारले, तेव्हा त्यात मला लाचारीच्या छटा आणि सूडाच्या ठिणग्या दिसल्या. मी वेभररला खुणावलं. त्याने रिकाम्या वशा नेल्या. विल आणलं. ते मी चुकतं केलं. नंतर न राहवून मी म्हटलं,

"मित्रा, तू एखादी बारीक नोकरी बघ बाबा."

"तुला परत लहर आली वाटतं पेट्रनकी गाजवण्याची ?"

"तसं नव्हे रे, पण तुझ्या अशा वागण्याला जगात लाचारी म्हणतात. चार चार प्लेटी आईस्क्रीम कुणी खाल्लंय ? वाईट दिसतं हे."

"का ? असंही असणं शक्य आहे की माझ्या घरचा फरीझ बिघडला असेल नि त्यामुळे फरीझमधली चवदार फळं आणि घट्ट साईचं क्रीम खायला चटावलेल्या माझ्या जिभेनं वऱ्याच दिवसानंतर संधी मिळाल्यावरोवर चट्टामट्टा केला असेल. कदाचित् हेच खरं असेल. मी तुला काय म्हटलं मघाशी? सत्याला भिडणारा मार्ग असाच गुंतागुंतीचा असतो."

"आवाची टांग तुझ्या !" मी बोलून गेलो.

"का ? जिथं माझ्याकडे फ्लॅट आहे, टेलीफोन आहे, तिथं फरीझ नसेलसं वाटलं तरी कसं तुला ? सुखं काय फक्त तुम्ही लोकांनीच भोगावीत नि आम्ही काय उन्हात पाठी शेकत बसावं ?"

मी सैरभैर झालो. मला काहीच कळेना. नाना परचुऱ्याचं कोडं उलगडेना. फ्लॅट, फरीझ, टेलीफोन, घट्ट साईचं क्रीम, हे सारे सुखोपभोग वाह्यतः फटींग दिसणाऱ्या नाना परचुरेकडे कसे काय आले ? कुठल्या खुंटचा त्यानं पिळल्या? की मला परस्पर विरुद्ध दर्शन देण्यात त्याला माझ्या सुरक्षित स्वास्थ्यावर सूड घेतल्याचा विकृत आनंद होतो आहे? की खरोखरच सत्याला परस्परांना छेद देणारे रग्गड पैलू असतात ?

"आनंद आहे ! सुख सर्वांनी भोगावं. तू सुद्धा मनसोक्त भोग. मी निघतो आता" क्रीमसेंटरच्या बाहेर पडता पडता मी कोरडं बोललो.

"घरी ?" त्यानं विचारलं.

"अर्थात !"

"असं कसं ? आईस्क्रीमवर मुखशुद्धी हवीच. चल, आपण मसालेवाली कलकत्ता पान खाऊया."

समोर रस्त्याच्या पलीकडे पानाचा ठेला होता. प्रश्न फक्त उलटया वाऱ्याच्या झोतात पाच पावलं चालण्याचाच होता. मध्ये फक्त एक जुनी आठवण आली नि मी अडखळलो.

—गुरुजींचा, सेनापतींचा शब्द न् शब्द आही हृदयात रोवत असू तो वीस वर्षापूर्वीचा धुंद काळ. मिसरूड फुटलेले आम्ही सुटीच्या दिवशी हातात झाडू, खराटे, घमेली, घेऊन पोळ्याच्या बैलांसारखे मिरवत मिरवत पहाटेच्या काळोखांत गटारे साफ करायला जायचे. चांगले चार चार तास आम्ही गटारात हाशहुश करायचे. निवडणूक उंबरठयावरच आली. दर शिविराला पाच रुपयांची पावती फाडणारा एक गोरागुबरा वकील आमच्या मर्जीतल्या पक्षाच्या बाजूने






शड्डू ठोकून उभा राहिला. त्याचा मला भेटीसाठी निरोप आला. माझी कळी फुलली. परचुरेला घेऊन मी वकीलांच्या घरी गेलो. त्यांच्या घराचा व.दशाही थाट आणि त्यांची मोत्याच्या कांतीची मारडाला बायको पाहून तर माझी तहानभूकच हरपली. वकीलमहाशय रेशमी आवाजात म्हणाले,

"तुम्ही गुरुजींचे, सेनापतींचे मावळे. तुम्ह.ला काही गोडधोड देईन म्हणतो. तुम्ही कितीजण आहात ?"

"पंधरा–सोळाजण."

"मग जेवायलाच या की सारेजण. केव्हा येता? भाऊभाऊ म्हणून नांदायचं नि पंक्तीचा योग आणायचा नाही हे खरं नव्हे."

"जेवण काय, मिळाल्यातच जमा आहे; पण आमची गरज जरा वेगळी आहे." मी गहींवरून सांगितलं.

"कोणती ?"

आम्हाला लांब दांडचाचे डझनभर झाडू विकत घेऊन द्या. सध्या आम्ही म्युनिसिपाल्टीचे आणतो; पण त्यांचे मुकादम आम्हाला जामतात. म्हणतात, 'तुम्ही अन्नाडी काय बुतारे वापरणार ? निष्कारण मालाची नुकसानी करू नकात.' म्हणून आपले सत्तेचे झाडू असले की ओशाळगत नको."

"पटलं. उद्या तुम्हाला सत्तेचे झाडू मिळतील."

दुसऱ्या दिवशी सत्तेचे, बारा लांब दांडचाचे झाडू घेऊन मी घरी परतलो. जेवण लाथाडल्याबद्दल परचुरेने माझ्यावर चिक्कार डाफरून घेतलं. गोऱ्या वकीलाचं पुन्हा बोलावणं आलं. आम्ही गेलो.

"झाडू रजिस्टरात नोंदवले ?" तोंडातला चिरूट पेटवीत वकील महाशयांनी शांतपणे विचारलं,

"हॉच्या ! आम्ही त्यांनी सफाईही करायला सुरवात केली."

"मग कळवलं नाहीत ते ?"

"त्यात काय कळवायचं ? हे काम आम्ही वर्षो न् वर्ष करतोय."

"पण आता काळ बदललाय. झाडू मी दिले ना ? तर तुम्ही आता माझ्याच मतदारसंघातली गटारं साफ केली पाहिजेत. एकदा का मी निवडून आलो की आपण सारेजण मिळून क्रांतीकार्याला लागू. होय की नाही ?"

"नाही." मी ठामपणे उत्तरलो, "तुम्ही आमच्यावर अटी लादू शकत नाही."

"आम्ही असं करू; निवडणूक होईपर्यंत आम्ही तुमच्या मतदारसंघात सफाई करू. मात्र निवडणुकीनंतर आमचे आम्ही राजे !" कारण नसताना परचुरे मध्येच कबूल करून बसला. वकीलसाहेब चिरूटावरची राख झाडत म्हणाले,

"दॅटस् इट. निवाडा करावा तर असा !" माझा नाईलाज झाला.

त्यानंतरच्या रविवारपासून आम्ही, निवडून आल्यावर क्रांतीकार्याच्या मुंडावळ्या बांधू इच्छिणाऱ्या त्या गोऱ्यागुबऱ्या वकील महाशयांच्या मतदारसंघातली गटारं सत्तेच्या झाडूंनी निष्ठापूर्वक चकाचक करू लागलो.

निवडणूक वाऱ्यासारखी आली नि वाऱ्यासारखीच गेली. गटारं स्वच्छ झाली. क्रांतीकार्येच्छू वकीलमहाशय विजयी आले. क्रांतीकार्याचा श्रीकार म्हणून त्यांनी आम्हाला एका शुक्रवारी चण्यांची सुकी भेळ खाण्यासाठी बोलाविलं. त्या खान्याला परचुरेनं मला ढकलत ढकलत नेलं. जाताना पावलांना लागलेला तो लाचारीचा चिखल पुसून टाकण्यासाठी मला रिंगणाबाहेर पडून बराच काळ टाचा घासत घासत अनवाणी चालावं लागलं होतं.

ती चाल आठवून मी क्षणात निश्चय केला, परचुरेला लाळ गाळायची संधी द्यायची नाही. मी ठासून सांगितलं,

"नको."

"असं कधी झालंय ? आईस्क्रीम पार्टीवर कलकत्ता मसाला हवाच."

"नो मीन्स नो. बालबच्चे वाट बघताहेत माझी."

"अरे हो; कुठं फ्लॅट घेतलाहेस म्हणालास ? दे पाहू तुझा नवा पत्ता मला."

"सॉरी." मी खंबीरपणे म्हणालो.

"ठीक आहे. घरी किती मुलं आहेत म्हणालास ?"

"दोन."

"मग असं कर ! ह्या दोन चाक्या देतो मी तुला. त्या घे नि तुझ्या दोघा मुलांना दे. म्हणावं, नानाकाकांनी गो–गो दिलाय तुम्हाला. इतकं बोलून त्याने खिशातून चाक्याची बाटली काढण्यासाठी खमीसात हात कोंबला. मी चेहऱ्यावर पूर्ण नापसंती दर्शवीत कर्कशून म्हणालो,

"नाही परचुरे, माझी मुलं नाही चाक्या खाणार तुझ्याकडच्या."

"मित्रा, अरे प्रेमाने देतोय मी." तो आर्जवी स्वरात म्हणाला.

"ही भाषा बंद कर परचुऱ्या !" मी निक्षून बोललो, "लाचार बनवतं ते प्रेम कसलं ?"

"पण असंही असणं शक्य आहे की–"

"आय से", त्याचं वाक्य कापीत मी आवाज तापवीत सांगितलं, "प्रेम आणि लाचारी एकत्र नांदत नाहीत. प्लीज गो !"

त्याचा चेहरा कोमेजला. खमीसात कोंबलेला निर्जीव हात त्यानं बाहेर काढला आणि पाठ फिरवून तो पाताळ धुंदीत चालू लागला.

• • •

**एक नवीन कॉकटेल पार्टी !....**



**वाटलं वार्ताहराना 'पार्टी' असेल पण निघाली मोलोटॉव्ह कॉकटेल पार्टी !**










# कथा काममंजिरीची

'वासूनाका' या भाग्यवान पुस्तकाला सुष्ट आणि दुष्ट टीकांचे अहोभाग्य नुकतेच लाभले तसेच विपुल भाग्य संस्कृत महाकवी 'दण्डी' याच्या 'दशकुमारचरित' या लोककथांच्या स्वरूपाच्या ग्रंथालाही आज अनेक शतके लाभलेले आहे. कारण दंडीची ही कथा हीही सांकेतिक. आदर्श बादाच्या मखमली बंधनात घोटाळत न बसता समाजात सतत असणाऱ्या बकाल वास्तवातून स्वैरपणे विहरणारी एक कथा आहे. ठक लुच्चे, ढोंगी, भोंदू, चोर, जार, कुंटिणी, वेश्या अशांच्या बैठकीत मोकळ्या दिलखुलासपणे मिसळण्यात या कथेला संकोच वाटत नाही या विस्तृत ग्रंथाचा साचा 'एक कथा' या स्वरूपाचा असला तरी त्या कथेच्या पोटात, कथेमागून कथा, कथेतून कथा, असे अनेक कथा व्यूह आहेत. या व्यूहातील एक छोटासा दुवा इथे रसिकांसाठी सादर करावयाचा आहे. मान्यवर टीकाकारांनी दशकुमारचरितातील एक रम्य स्थल म्हणून या कथेचा खास नामोल्लेख अनेकदा केलेला आहे. या कथेत काही बोध असला तर तो सुबुद्ध वाचक घेतीलच परंतु कथानायिकेच्या मातेचे जे प्रदीर्घ भाषण या कथेत आहे ते अवश्य लक्षणीय आहे. प्रतिष्ठेचा विचार केला तर कथेतील गणिका नायि केची तुलना आजच्या एकाद्या आघाडीच्या चित्रतारकेशी होऊ शकेल. ही आघाडी मिळविण्यासाठी किती जणांचे आणि किती दिवसांचे डोळस कष्ट आणि तपस्या.

—आनंद साधले



पण ते या प्रस्तावनेपेक्षा प्रत्यक्ष कथेत पाहणे अधिक बरे—
या कथेचा श्रोता आहे राजवाहन —
तो सांगत आहे अपहारवर्मा. तो म्हणतो :—

महाराज, मी समोर पाहिले. तिथे एक आंब्याचे झाड होते कोवळे. आकाराने डवरलेले. पालवीने शृंगारलेले. त्याखाली ए माणूस वसलेला होता. खिन्न, उदासवाणा, युगायुगाच्या व्यथांखा जणू वाकलेला. मी त्याच्याजवळ गेलो; आणि त्याला विचारले,

"महाराज, मरीची ऋषीचा आश्रम कुठे आहे? मी त्यांच दर्शनासाठी आलो आहे."

त्यावर तो खिन्न माणूस अधिकच उदास झाला. त्याने एक दी निश्वास सोडला आणि तो म्हणाला,

"होता. त्या नावाचा एक ऋषी एका काळी इथे होता. तू न नवखा दिसतोस. ऐक. ऐक त्याची कहाणी."

सकाळची वेळ होती. मरीची ऋषी स्वाध्याय करीत होत त्याचे नेत्र मिटले होते. ध्यान चालू होते. इतक्यात त्याच्या पाया कुणाचा तरी स्पर्श झालासे त्याला वाटले. त्याने नेत्र उघडून पाहि त्याच्या चरणाला स्पर्शून एक तरुणी त्याला वंदन करीत होती.

तरुणी मोठी रमणी होती, कामिनी होती. जशी रतीची पुतळी; जशी कापुराची बाहुली. जशी पोसलेली केळी; जशी चांफ्याची कळी. मोठी रूपवान–मोठी मोहक; मोठी मादक. या नगरीचे–या पृथ्वीचे जणू भूषण !

पण यावेळी ती खिन्न दिसत होती. तिच्या नयनांतून अश्रुबिंदू टपटपा गळत होते. तिचे स्तन त्या अश्रूंच्या धाराना अडवीत. अश्रू मग त्या कंचुकीत जिरुन जात. त्यांच्या गोल इवल्या खुणा उरत. आकाशासारखे विशाल स्तने! तारकांसारख्या इवल्या गोल खुणा ! वाटे, ओल्या वस्त्रातून स्तनांची कांती उसळत आहे–वाटे, खरेच तारे चमकत आहेत; खरेच तारे चमकत आहेत. आभाळासारखे विशाल स्तन. इवले इवले तेजाळ तारे.

तिचे केस लांब होते. लांब–विपुल–चमकदार–तेजाळ–काळे. इतके लांब की तिचा देहच झाकून टाकतील. जणू त्या सौंदर्याची गवसणी. जणू त्याचे देवदत्त वस्त्रच. कदाचित कधी वस्त्र नसले तरीही चालेल. ते केस आता सुटे होते. चौफेर पसरले होते. मातीत लोळीत होते. तिला त्याची शुद्ध नव्हती.

मरीचीने विचारले, "तू कोण ?"

ती म्हणाली, "मी काममंजिरी. गणिका."

तेवढ्यात एक पोक्त स्त्री आणि तिच्या मागून स्त्रीपुरुषांचा एक घोळका धावत आला. ती सारी जणे काममंजिरीविषयीच्या ममतेने व्याकूळ झाली होती. त्यानीही मरीचीपुढे धुळीत लोटांगण घातले. व्यथेच्या त्या दर्शनाने मरीचीचे कृपाळू मन द्रवले. स्नेहाळ वाणीने सर्वांना आश्वासन देत त्याने विचारले, "काय झाले आहे ?"

तेव्हा काममंजिरी म्हणाली, "भगवान, मी ऐहिक सुखाला विटले आहे. मला परमसुखाची ओढ लागली आहे. मी तुम्हाला शरण आले आहे. कारण शरणागताचे कल्याण करण्याचे तुमचे सामर्थ्य विख्यात आहे."

काममंजिरीच्या स्वरात जादू होती. तिच्या अक्षराअक्षरातून, ती गणिका असल्याचा संकोच, तिच्या ओढीच्या व्यथा आणि तिच्या गुरुभक्तीचा आदर आणि गौरव उसंडत होता. एका एका अक्षराच्या उच्चारातून अर्थाच्या सरीच्या सरी ओतत होत्या. तिची व्यथा, तिचा आत्मा, तिची अस्मिता, शब्दांचे रूप घेऊन बाहेर येत होती.

काममंजिरी थांबली. तशी ती प्रौढा पुढे सरली. तिचेही केस मोकळेच होते. वयाचा उतार सुचविणाऱ्या रंगछटा त्यात चमकत होत्या. तिने भूमीवर लोटांगण घातले आणि नंतर उठून हात जोडून ती म्हणाली,

"महाराज, मी हिची आई. ही आता तुम्हाला जे सांगणार आहे तो सारा माझाच दोष आहे. हिची आई म्हणून मी माझ्या कर्तव्याला जागले. त्याचे हे फळ. मी गणिकेची आई झाले, हा माझा दोष. महाराज गणिकेच्या आईचे भोग तुम्हाला काय सांगू ? ही एवढीशी टीचभर होती. तेव्हापासून मी हिला हळद चोळली. यावर सुगंधी तेले जिरविली. कशासाठी ? हिला ही सोनसळी कांती यावी म्हणून. हिच्या अंगाला हा मदनबाणाचा सुगंध यावा म्हणून सकाळ संध्याकाळ हिच्यासाठी मी स्वयंपाक केला. सुवासिक तांदूळ. मुगाची डाळ, गाईचे तूप. हिच्यासाठी मी हरिणीची कोवळी मांडी निवडून आणावी. चोवीस तास ती मंदाग्नीवर उकळून लोण्यासारखी मऊ शिजवावी. तिला मान वेळा सोन्याची फोडणी द्यावी. आणि प्रत्येक घास तोलून मापून स्वतःच्या हाताने हिला भरवावा. घरच्या गाईचे ताजे दूध प्रत्येक वेळी धारोष्ण काढून हिला पाजावे. मधात मुरलेल्या द्राक्षाचा खुराक हिला द्यावा. हे सारे कशासाठी ? तर केवळ हिचे शरीर पोसले जाताना त्रिदोष आणि सप्त धातू यांचा समतोल साधावा म्हणून ! महाराज पहा हिच्याकडे. ही कंबर. हे स्तन. सारे कसे हवे तसे आहे. जिथल्या तिथे. यात आरोग्याचा एक बिंदू कमी नाही. वाताची एक गुंजही जास्त नाही. शेवंतीच्या फुलासारखे रसरशीत तेज, निरामय शक्तीने टचलेला हा प्रत्येक स्नायू, मुशीतून काढलेल्या सोन्यासारखा हा वर्ण आणि याना साजेशी हिची बुद्धी ! ही सारी उगाच आलेली नाहीत. इतकी वर्षे मी तपस्या केली त्याचे हे फळ आहे. ही तपस्या मी केली, हा माझा दोष !

"महाराज, ही पाच वर्षांची झाली तेव्हापासून मी पुरुषाची नजर म्हणून हिच्यावर पडू दिली नाही. पुरुषाच्या नजरेचा भरवंसा नाही हो ऽ ! मी ती नजर बरोबर ओळखते. त्यामुळे तिच्या पित्याला सुद्धा मी तिच्याकडे जाऊ दिले नाही. अशी तिला जपली. प्रत्येक सणाला, तिच्या प्रत्येक वाढदिवसाला मोठा उत्सव करुन तिला मंगलविधी केले. हे सण तिच्याचसाठी आहेत असे वाटून तिची अस्मिता फुलत जावी म्हणून जपले. आमचा व्यवसाय गणिकांचा. नुसता कुणाला डोळा घातला तर तो पाय पाघळायला हवा असे विभ्रम हे आमचे सामर्थ्य. ही आमची विद्या पायांच्या नखापासून केसांच्या टोकापर्यंत ही विद्या बाणली तर आम्ही जगणार. ती विद्या मी हिला शिकविली. हिला नाचायला शिकविली, गायला शिकविली, वाद्याचे ताल सूर शिकविले, अभिनय शिकविला, मद्याचा आस्वाद रुचीने घ्यायला शिकविले, सुगंधाची मिसळण आणि ओळख शिकविली, फुलांची सुंदर रचना करायला शिकविले, लिहायला शिकविले, वाचायला शिकविले, खोचदार बोलायला शिकविले, दुसऱ्याच्या बोलण्यातील अर्थ ओळखायला शिकविले. हे सारे मी केले हा माझा दोष.

"मुनिराज, तुम्हाला काय सांगू ? मी हिला व्याकरण शिकविले आहे; तर्कशास्त्र शिकविले आहे; ज्योतिष शिकविले आहे. पुढे येतील त्या गोष्टीतील सारासार विचार जाणावयास शिकविले आहे. जीवन जगावयाला मार्गदर्शक तो व्यवहार शिकविला आहे. प्रीतीच्या खेळात साकार होणारे सारे खेळ शिकविले आहेत; आणि त्यात ही मोठी कुशल आहे. द्यूताच्या जेवढ्या पद्धती आहेत त्या साऱ्यात हिचा हातखंडा आहे. रतिक्रीडा पारंगत रसिकाला सुख देणे हे आमचे कर्तव्य. ही गोष्ट सोपी नाही. नुसती सांगूनही येत नाही. पुरुषांच्या किती परी परी असतात. कुणाला कुठची रीत सुखविते. कुणाला कुठचे आसन मानवते. सांगण्याआधी हे जाणून सहकार दिला गेला तर खेळ रंगतो.








पुरुष.च्या वृत्ती जाणून त्याने कुठे, केव्हा, कसा, स्पर्श केला तर कसे लाजावे, रुसावे, खुलावे, फुलावे हे जाणायला हवे असते. त्यालाही कुठे कसे डिवचून हसवावे, नाचवावे, जागवावे हे जाणायला हवे असते. शरीर वाकवायला, मुरडायला, शिकावे लागते. मार्ग रुळवावे लागतात, वेदना पचवाव्या लागतात. लग्नाच्या संसारात सारी जुळणी समजुतीने होते. गणिकांच्या संसारात समजुतीला समय नसतो. व्यवसायात पडण्याआधीच साऱ्या गोष्टीचे प्रत्यक्ष ज्ञान विश्वासू स्वजनांच्या सहकार्याने प्रयोगात आणावे लागते तेव्हा कुठे सारी तयारी होते. या तयारीत मी हिला पारंगत बनविले आहे. हे कष्ट मी घतले हा माझा दोष !"

"एवढयावर कुठे भागले आहे ? हे सारे शिकून झाले, स्वतःच्या मनाचा क्रीडाबिंदू झरण्याआधी पुरुषच हटकून जीत होईल इतका कामाचा खेळ नसात मुरला तरी अजून जाहीरात व्हायची असते. ती हिच्यासाठी मी केली. कुठे यात्रा असतील, उत्सवप्रसंग असतील तिथे मी हिला गौरीसारखी नटवून शेकडो सख्यांच्या वैभवात फिरविली. संगीताच्या मैफली झाल्या, त्यात आधीच बांधून ठेवलेल्या कला शिक्षकांकडून हिला सिद्धी मिळवून दिली. मोठमोठे वादक देशात फिरतील तेव्हा त्यांच्या कलेचा कुणी गौरव केला तर त्यानी 'अहो आमचा कसला गौरव ! कुठे चार बोल काढता येतात हा काममंजिरीच्या शागीर्दीचा प्रसाद. जन्माला आलाच आहात. आता एकदा तिची बैठक ऐका.' असे म्हणून हिचे यशगान पसरावे अशी योजना केली. हस्तसामुद्रिक आणि ज्योतिषी याना बांधून घेऊन ते ज.तील तिथे काममंजिरीची कल्याण लक्षणे गातील असे योजिले. रसिकांचा समुदाय जमला असेल तिथे विटाना, चेटाना, विदूषकांना भिक्षुणीना, चारिणीना पाठवून त्यांची मने चाळविली. कुणी म्हणावे, 'अहो, रूप पहावे तर काममंजिरीचे.' त्यावर दुसऱ्याने म्हणावे, 'अहो पण उपयोग काय ? त्या शीलवतीचे नख तरी दिसेल काय ?' त्यावर तिसऱ्याने उद्‌गारावे, 'व.वा, असले स्वर्गीय सौंदर्य काय रस्त्यावर असते ? भाग्य आणि तपस्या याची जोड असेल तरच ते दिसते.' चवथ्याने म्हणावें, 'एकवेळ तिच्या माधुरीची गोडी कळली की जीवाचे सार्थक होऊन जाते.' अशा रीतीने रसिक तरुणांची मने तिच्याकडे झेपावू लागली की आणखी कुणी म्हणावे, 'बाबा, अगणित धनाचे पाठबळ असेल तर या माधुरीच्या गोष्टी! पण कुबेराचे धन हिच्यावरून ओवाळून टाकले तरी कमीच.'—

"ही जाहीरात झाल्यावर सारे विश्व तिच्या प्रेमाने आंधळे झाले. तिच्या नुसत्या दर्शनानेच सारे रसिक ब्रह्मानंदात डुलू लागले. त्यातून जो कुलाने राजासारखा, रूपाने मदनासारखा, वयाने अभिमन्यूसारखा, धनाने कुबेरासारखा, शक्तीने नंदीसारखा, शुचितेने रामासारखा, त्यागाने बलीसारखा, कौशल्याने कृष्णासारखा, दाक्षिण्याने उग्रवर्तासारखा, सौष्ठवाने हनुमंतासारखा, शीलाने लक्ष्मणासारखा, आणि स्वभावाने सुधाकर चंद्रासारखा पुरुष असेल त्याची चोखंदळ निवड मी हिच्यासाठी करू लागले. असा गुणसागर आणि बुद्धिवान तरुण स्वतः मुखत्यार नसेल तर जे काय थोडेबहुत दान तो देईल त्यात हिने त्याला बहुरंगी सुख द्यावे; गांधर्व प्रीतीच्या रमागमांचे लपेछपे नाजूक पाश त्याभोवती टाकावे आणि मग मी त्याच्या पालकाना कैचीत गाठून धनाची साधना करावी असा शिरस्ता ठेवला. नगरात जे सत्ताधीश पुरुष असतील त्याना कोणत्याही लाभाशिवायच सारी सुखे देववून मग त्यांची सत्ता हिच्या सेवेत राबविली. धनवान पुरुष प्रणयाने बांधला असेल तवर त्याच्याशी एकनिष्ठ रहावे, नित्याच्या देणग्या तर त्याच्याकडून घ्याव्यातच, पण सणावारी नैमित्यिक देणग्याही घेऊन शिवाय प्रणयाची माधुरी ओठांना देताना सुद्धा प्रीतीच्या म्हणून खास देणग्या घ्याव्या, आणि एवढेही करून धन उरले असेल तर नाना नखरे करून ते आत्मसात करावे हे मी हिला शिकविले. देणग्या देण्याची शक्ती नसलेल्या आंबटशोकी लोचटाना गचांडी मारून मी दूर केले. सहगणिकांच्या प्रियकरांच्या प्रोत्साहनाने आलेल्या नवशिक्याच्या प्रेमाबरोबरच त्याच्या दानशक्तीलाही स्फुरण चढेल अशी योजना मी केली. हे प्रियकर निर्धन झाले म्हणजे त्याना लागट कसे बोलावे, लोकात त्यांचा जाहीर उपहास कसा करावा, त्याना शरम वाटेल अशी त्यांची उपेक्षा करून दुसऱ्याजवळ कसे जावे, आणि अपमान करून त्याना कसे टाळावे याची जपणूक मी केली. धन कोण देईल, उपद्रव कोण टाळील, निर्दोष कोण आहे, निरोगी कोण आहे, धनवान कोण आहे, याची बारीकसारीक छाननी जागेपणाने सतत करून मी हिला यजमान पुरविले. हा माझा दोष !"

"महाराज, यजमान आला की प्रेम करायला गणिका तयार हवी. तिला स्वतःच्या मनाचे लागेबांधे जुळवून चालत नाही. तो फुलून येईल तेव्हा तिने फुलायला हवे. हाच तर आमचा धर्म आहे. कुठे मन जळतेसे वाटत असले तरी गणिकेने आईच्या अधिकाराबाहेर जाता नये. कारण आई तिच्यासाठी इतकी झिजलेली असते. असे असता हिने देवाने नेमून दिलेला धर्म सोडलेला आहे. आगांतुक आलेल्या एका ब्राह्मणाच्या नुसत्या रूपावर भुलून गेला. महिनाभर ही त्याला स्वतःच्याच खर्चाने सारे उपभोग देत आहे. धनाच्या पिशव्या घेऊन दारात धरणे धरून बसलेल्या यजमानांचा उपहास करून त्यांना हिने संताप आणला आहे. आम्हा कुटुंबियाचे प्राण उपासमारीने कंठाशी आणले आहेत. मला वाटले, असेल तिला तो आवडला. मिळत असेल तिला विशेष सुख; होईल चार दिवसानी शांती, पण कुठून हो ? ही त्याला सोडतच नाही. शेवटी माझा नाइलाज झाला. ही दुर्बुद्धी मल्याची नाही म्हणून मी रागावले तर ही डोक्यात राख घालून वनवासाला आली आहे. हिचा हा निर्णय ढळणारच नसेल तर मी आणि ही माझी माणसे इथेच तुमच्या पायाशी धरणे धरून अन्नत्याग करणार आहोत."

आई हे सांगत असता काममंजिरी अजून मरीचीच्या गुडघ्याना मिठी मारून बसलेली होती. तिच्या स्तनांचा भार त्याच्या मांडीवर विसावला होता. याचनेचे दीन अश्रू ढाळणाऱ्या नयनानी ती त्यांच्याकडे पहात होती. तिच्या मस्तकावरून हात फिरवीत मरीची म्हणाला.

"वेडे, किती कोवळे हे तुझे शरीर. किती आगळे हे तुझे लावण्य ! वनवासाची दुःखे तुला कशी सोसणार ? आणि वनवासात राहून मिळणार काय ?









कारण तो आत्मज्ञानाशिवाय मिळत नाही; आणि आत्मज्ञान कुणाला होत नाही. स्वर्ग मात्र मिळण्याजोगा आहे. पण त्यासाठी तुझ्यासारखीला वनाचे कष्ट कशाला? प्रत्येकाने आपले कुलधर्मपालनाचे कर्तव्य केले की तो घरीच मिळतो. गणिकेची कर्तव्ये करून तो तुलाही मिळेल. जा, आई सांगते ते ऐक."

मुनीचे हे शब्द ऐकून काममंजिरी आर्त स्वराने म्हणाली,

"भगवन्. साऱ्या जगाला तुमचा आधार पण मी दुर्भागी. मलाच तेवढी तुम्ही दूर सारता. आता हा अग्नीच माझा आधार ठरो."

म्हणून ती झटक्याने यज्ञकुंडाकडे धावली. तिचे आप्तजन हताशपणे हाहाकार करीत आहेत तोच मरीची वाऱ्यासारखा उठला आणि त्याने काममंजिरीला मिठीत सावरले. तिला आपल्या छातीचा आधार देत तो तिच्या आईला म्हणाला,

"तुम्ही आज घरी जा. चार दिवस जाऊद्यात. ही सुकुमार आहे. हिला सुखोपभोगाची सवय आहे. वनवासी जीवनाला ही लौकर च कंटाळेल. तिची मूल प्रवृत्तीही जागी होईल. मीही तिला उपदेश करीन. सारे नीट होईल. तुम्ही काळजी करू नका."

मुनीने असे सांगितल्यावर आई जायला निघाली तेव्हा काममंजिरीने आपले सारे अलंकार काढून तिच्यापुढे फेकले. जरतारी कंचुकी ओरबाडून तिच्या अंगावर टाकली. आतली चोळी सोडून उडविली. बहुमूल्य रेशमी साडी फराफरा सोडून लाथेने ठोकरली. तिच्या अंगावर आता आतली अष्टपुत्री तेवढी राहिली. ती म्हणाली,

"जा तुझे वैभव घेऊन. एवढे वस्त्र मला पुरे. बदलायला दुसरे धतवस्त्र मी महाराजांकडून घेईन."

सारी निघून गेल्यावर काममंजिरीने मरीचीची सेवा करावयास आरंभ केला. अनन्य भक्तीने ती वागू लागली. स्नानशुद्धीसारखे संस्कार सोडून तिने देहाचे इतर सारे चोजले बंद केले. मुनींच्या आश्रमातील कोवळ्या रोपट्याची आळी ती पाण्याने भरी. मुनींच्या देवपूजेसाठी फुले जमा करून मोठ्या कौशल्याने त्याची मनोहर गुंफण करी, मुनी शंकराच्या पूजेला बसला की ती गंध, फुले, धूप, दीप, हे सारे उपचार त्यांच्या हातात देई. शंकरासमोर ती भिल्लिणीचे मनोहर नृत्य करी. सुंदर रागदारीचे गायन करी. मरीची जे जे तप करी त्यात त्यात तिचा सहकार असे. मुनी चिंतनासाठी एकांतात गेला की ती मागून जाऊन ती त्याच्या पायाशी बसे. आपल्या मऊ मांडीचे आसन त्याच्या पावलांना देई. आपल्या कोमल हातानी त्याचे चरण चुरी. धर्म, अर्थ, काम या त्रिवर्गाची चर्चा त्याच्याशी करी. कधी एकाद्या शंकेचे समाधान झाले म्हणजे भक्तीने भारावून जाऊन मुनीचे चरण आपल्या छातीशी भक्तिभावाने आवळून ती सुखसमाधीत जात असे. कधी समर्पणाने मुनीच्या गुडघ्यांना मिठी मारून त्याच्या मांडीवर शरणांगतीने मस्तक टेकीत असे.

काममंजिरीच्या भक्तीची अशी समाधी जुळू लागली. मरीचीच्या वृत्तीची समाधी ढळू लागली. तिच्या पोसलेल्या, मऊ, मांसल मांड्यांवर विसावण्याची सवय त्याच्या पावलाना होऊ लागली. ती भक्तीने कधी मिठी मारते आणि तिचे टणक स्तन आपणाला कधी टुपतात म्हणून त्यांचे गुडघे हुळहुळू लागले. आशीर्वादासाठी तिच्या मस्तकावर ठेवलेले मुनीचे हात खाली खाली सरकू लागले—मस्तकाच्या उतारावर – मानेवर – पाठीवर, कण्याच्या पन्हळीवर, कमरेच्या वाकणावर—आणि कधी कधी——

अशा वेळी मरीची वाके. त्याची मांडी आणि छाती यात तिचे मस्तक दामटे. त्यावेळी भक्तीचे शहारे तिच्या अंगावर थरथरत. अवघडलेल्या हाताची मिठी गुडघ्यावरून कमरेवर सरके. समर्पणाच्या नेणिवेत ती दाटे. तिच्या घनगोल स्तनाना पुरेशी जागा उरली नाही हे मरीचीला जाणवे. पण ती——ती भक्तीच्या महासागरात बेधुंद झोकीने डुंबतच असे—

असे दिवस गेले, मास गेले, वसंत आला—

आंब्याच्या डहाळी डहाळीवर मंजिऱ्या फुलल्या. कुठून नकळे, विश्वातले सारे लोलूप भ्रमर त्या वनात जमा झाले. आंब्याच्या मोहरातूनच जणू कोकिळा प्रगटल्या. सुगंध आणि संगीत ही ओंजळी भरभरून प्यावीशी वाटावी अशी दाटली. दिशादिशांचे रंग पानापानात फुलले; वृत्तीवृत्तीत उतरले. मदन बाण आणि मधुमालती गळ्यात गळा घालून रंगात नाचू लागली. सजीवसृष्टीतील एकटेपणा पार लोपला. हरिणीने लुसलुशीत अंकुर तोडावा तो हरिणाने तिच्या ओठातूनच ओढावा. भ्रमराने चोखलेला मधाचा बिंदूच अधिक गोड मानून भ्रमरीने तोच चोखण्यासाठी लगटावे! सारी सृष्टीच अशी एकट्याची दुकटी झाली. आणि पुन्हा दुकट्याची एकटी झाली. माजाचा उन्माद सृष्टीत माजला, भरला, पुरला—उरला, उतू जाऊ लागला —

मरीचीही या उन्मादात भिजून चिंब झाला. चिंब झाला.—

भक्तीची मूर्तीच अशी श्रद्धामयी काममंजिरी पायाशी होती.








मरीचीचे पाय मांडीवर घेऊन ती ते चुरीत होती. उजवे पाऊल डाविल्या बाजूला होते. ते मध्येच कधी तिच्या नितळ उदराला स्पर्शीत होते. किती नितळ तो स्पर्श. एकाच मरीचीची दोन पावले. पण डावे पाऊल उजव्याच्या मत्सराने वळवळत होते. त्यालाही मांडीचा स्पर्श होताच. मांडीही मऊ होतीच; नितळ होतीच; पण उदर–

मध्येच काममंजिरी वाकल्यासारखी झाली. स्तनांचा भार पावलाला स्पर्शीलासे भासले. भासाची निश्चिती व्हावी म्हणून पाऊल जरा वर सरले. घोटचात दुमडले. वाटले दोन्ही स्तन त्या वाकणात मावतील. पण छे ! एक स्तनही पुरा मावणे कठीणच. मरीचीला वाटले, हे काम पावलाचे नव्हे, हे काम पावलाचे नव्हे.

काममंजिरी शंका विचारीत होती–

"महाराज, लोक किती मूर्ख. 'त्रिवर्ग' शब्दाच्या एका गठडीत ते धर्म, अर्थ, काम याना तोलतात. धर्माबरोबरच अर्थकामाची गणना करतात. खरे म्हणजे कुठे धर्म आणि कुठे अर्थकाम !"

"सुगंधिनी, तुला कोणत्या बाबतीत धर्म हा अर्थकामापेक्षा श्रेष्ठ वाटतो ?"

मरीचीचा हा प्रश्न ऐकून काममंजिरी संकोचाने लाजून लालमंथर झाली. ती लाडिक आदराच्या कोवळ्या वाणीने म्हणाली,

"महाराज, तुम्ही विचारावे आणि मी सांगावे ! ज्ञान का मी द्यायचे आणि तुम्ही घ्यायचे ? मला वाटते तुमची दासीवर कृपा झाली आहे. तुम्ही माझी परीक्षा घेत आहात. मी सांगते. पण माझे वेडे वागडे बोल चुकले तर हसायचे नाही. रागवायचे नाही हं."

"सांग. सांग."

"ऐका गुरुदेव–धर्मच नसेल तर अर्थाची आणि कामाची उत्पत्तीच होणार नाही. धर्म मात्र अर्थकामाशिवाय नांदू शकतो. चिंतनाने आपले आपण समाधान करून निवृत्तीच्या सुखाची जाण कुणालाही घेता येते. अर्थकामाप्रमाणे त्याला बाह्य साधनाची जरूरी नसते. तत्त्वदर्शनातून स्फुरलेले धर्मज्ञान एकदा जाणवले की त्या सदापवित्र स्थितीत कामवासनेचा स्पर्श सुद्धा मलीनता आणू शकत नाही. गंगेच्या जलात चूळ टाकली म्हणून तिचे मांगल्य विटाळत नाही. आकाशात धूळ उडविली तरी त्याची विमलता डागळत नाही. तसेच धर्मपूत व्यक्तीनी कामाचार केले तरी त्यांची साधना ढळत नाही."

"हे तू कशावरून म्हणतेस ?"

"महाराज, तिलोत्तमा काही ब्रह्मदेवाची धर्मपत्नी नव्हती. पण त्याने तिची अभिलाषा पुरी केली. स्वरूपसुंदरी उमा शंकराची पत्नी; सदा त्याच्या हाताशी. पण त्याने कामाच्या भरात एक हजार महर्षीपत्न्याना डाग लावला. विष्णु कमलेचा पती. तो सोळा सहस्र गोपांच्या अंतपुरात शिरला आणि त्याने त्यांच्या पत्न्यांचा भोग घेतला. प्रजापतीचे तर विचारूच नका. स्वतःच्या मुलीवरच त्याने डोळा ठेवला. इंद्र तर गोतमसवरून गौतमाच्या बायकोचा जार झाला. चंद्राने त्याच्या गुरुपत्नीच्याच शयनावर कामतृप्ती भोगली. सूर्याची कामवासना उफाळली. तेव्हा त्याने घोडीशी संभोग करून अश्विनीकुमाराला जन्म दिला. वायूने केसरीची पत्नी अंजनी हिच्या सहवासात आपली वासना शांतविली. बृहस्पतीने त्याचा वडील भाऊ उतथ्य याच्या बायकोच्या अंकावर कामशांतीचा अनुभव घेतला. पराशराने मत्स्यगंधेला कुमारी अवस्थेत डागविली. त्याचा पुत्र व्यास. त्याने विचित्र वीर्याच्या बायका भोगल्याच पण त्यांची दासीही भोगिली. वासना अनावर झाल्या तेव्हा अत्री ऋषीने हरिणीवरच काम भागवून घेतले. किती सांगू आणि किती सांगू ? हे सारे देव आणि महर्षि धर्मात्मे नव्हते का ? त्यांनी ही असुराना साजेशी अकार्ये केली तरी त्यांना खरेखुरे तत्त्वज्ञान असल्याने त्यांचा धर्म कलंकित झाला नाही. मी सांगितले ना ? आकाशात धूळ उडविली तरी ते मळत नाही तसेच त्यांचेही झाले. त्यांची धर्मकीर्ती अकलंक राहिली. म्हणून मी म्हणाले अर्थ काय आणि काम काय धर्माच्या अंशानेही त्यांना किमत नाही."

ही पूर्वऋषींची उदाहरणे ऐकून मरीची वासनेने ढवळून निघाला. तो म्हणाला,

" हे विलासिनी, धर्मज्ञ लोकांनी कामभोग घेतले तर फारसे विघडत नाही हे तुझे म्हणणे बरोबर दिसते. परंतु संपत्ती आणि काम यांचे हे भोग असतात तरी कसे ? जन्मापासून मी सारी वर्षे धर्म करीत वनात काढली. अर्थ आणि काम यांचे शास्त्र तरी काय आहे ? यांचे स्वरूप काय ? फळ काय ?"

"आधी अर्थशास्त्र सांगते. सांगू ?"

"सांग."

"पैसे मिळवावे, सांभाळावे आणि वाढवावे ही अर्थशास्त्राची व्याप्ती आहे. शेती करून, व्यापार करून, गो-धन पाळून, मित्रानाही लुटून, शत्रूना जिंकून अशा अनेक उद्योगानी धन मिळविता येते. मनाला योग्य वाटेल तिथे ते खर्चता येते हे अर्थशास्त्राचे फल होय."

"आणि कामशास्त्र ?"

"कामशास्त्र हे वासनेने ओला झालेला पुरुष आणि स्त्री यांचे शास्त्र आहे. अशा स्त्रीपुरुषांनी एकामेकांना सर्वांगाने स्पर्श करावा आणि ज्याला मर्यादाच नाही अशा सुखाचा अनुभव घ्यावा असे या शास्त्राचे स्वरूप आहे. या शास्त्राचे सहकारी साथीदार आहेत, ते या वसंतासारखे संगीतमय, गंधमय, रूपमय जसे रम्य आणि उज्ज्वल आहेत. ज्याला तुलनाच नाही असा आल्हाद, केवळ आल्हाद, हे त्याचे फळ आहे. आयुष्यभर पुरणाऱ्या रसमधुर स्मृती या त्याचा परिणाम आहेत. अतुलनीय अभिमानाची जाणीव हे त्याचे कार्य आहे. जे सांगता येणारच नाही, जे अनुभवावयासच हवे असे हे सुख आहे. याच सुखासाठी, जसा प्रसंग असेल त्याप्रमाणे कुणी उमेसारखे महान तप करते; कुणी आम्रपालीसारखी महान दाने देते; कुणी रावणाप्रमाणे महान संग्राम करते; तर कुणी रामाप्रमाणे सागर ओलांडण्याचे महत्कार्य करते. मुनीराज, तुम्हाला नवल वाटेल. पण ज्या सुखासाठी प्रेमाने आसक्त झालेली माणसे धडपडतात ते मिळविण्यासाठी त्यानी एकमेकांना कुसकरावे लागते, चुरडावे लागते, चेंगरावे लागते. अगदी निर्दय क्रौर्याने एकमेकांचा चोळामोळा करावा लागतो."

"काय म्हणतेस !"

"महाराज, पहावयाचे आहे ? क्षणभर उभे रहा. मी तुमच्या





समोर उभी राहाते. तुमचे हात माझ्याभोवती वेढा—आता मला जवळ घ्या घट्ट. अजून घट्ट. भिऊ नका. माझ्या बरगड्या मोडणार नाहीत. आणखी ज़वळ घ्या. तुमचे सामर्थ्य असेल तेवढे जवळ घ्या. तुमचे ओठ थरथरत आहेत. पहा. मी त्याना चावताच तुम्हाला आनंद झाला, याचे नाव कामशास्त्र."

पांथस्था, काय सांगू तुला मरीचीची अवस्था ! नियती त्याच्या विरुद्ध होती. त्यात आणि ती काममंजिरी नुसती नावाची काममंजिरी नव्हती. त्यातही पुन्हा त्या मूर्खाची बुद्धी चळली होती. जे व्हावयाचे ते झाले. मरीचीने त्याच क्षणी, स्वतःचे तप, स्वतःचा संयम आणि स्वतःचे ब्रह्मचर्य यावर एकदमच तिलांजली दिली. तो स्वतःला हरवून बसला. तिचा दास झाला.

मग एकदा ती त्याला म्हणाली,

"महाराज, ही कामसुखे, उघड्यावर, वनात, मातीत, जेवढी गोड लागतात त्याहून प्रासादात, वैभवात, शयनावर अधिक गोड लागतात. चला तीही अनुभव घ्या. माझ्यावरोबर माझ्या घरी चला. येता ?"

"हो चल ना."

मग तिने नगरातून पालखी मागविली आणि तिच्यात आपल्याजवळ त्याला बसवून वैभवशाली राजरस्त्यातून मिरवीत मिरवीत स्वतःच्या घरी नेले. उद्याच राजाने मदनमहोत्सव नियोजित केला आहे अशी घोषणा त्याचवेळी रस्त्यातून होत होती. उत्सवासाठी शृंगारलेले नगरच आमचे स्वागत करीत होते. घरी गेल्यावर तिने मरीचीला सुगंधी उटणी चोळून उष्ण पाण्याने मंगलस्नान घातले. राजशाही अलंकार आणि वस्त्रे चढविली. फुलाचा राजस शृंगार केला. तेव्हा तो मोठा विलासी पुरुष शोभू लागला. नाहीतरी आपण कोण ? काय ? हे तो विसरलाच होता. वनात ती सारखी समोर असे. इथे प्रासादात ती वैयक्तिक गरजासाठीही क्षणभर नजरेआड झालेली त्याला सोसेना.

दुसऱ्या दिवशी ती त्याला घेऊन मदनमहोत्सवाच्या उत्सवासाठी ठरलेल्या उपवनात गेली. तिथे शेकडो स्त्रियांच्या मेळाव्यात राजा बसलेला होता. राजाची खास नर्तकी महाराणीच्या डौलात त्याच्या शेजारी बसलेली होती. काममंजिरीचे कौतुकाने स्वागत करीत राजा म्हणाला,

"कल्याणी मुनिराजाना जवळ घेऊन बैस."

तेव्हा माझ्या मांडीवरच बसून काममंजिरीने राजाकडे पाहिले.

राजाने आपल्या नर्तकीकडे पाहिले. तेव्हा ती खाली उतरली आणि म्हणाली,

"महाराज, काममंजिरीने पैज जिंकिली आहे. या महर्षीच्या गळ्यात दावे बांधून तिने त्याला दास केले आहे. मी माझा पराभव मान्य करते. आजपासून ही राजनर्तकी झाली आहे आणि मी तिची दासी होत आहे."

असे तिने म्हणताच काममंजिरीचा मोठा जयघोष झाला. स्वतः महाराज, नंतर अधिकारी, नंतर पौरजन, नंतर इतर गणिका या सर्व्यानी मोठमोठे नजराणे देऊन काममंजिरीचा सत्कार केला. गाड्यानी भरून न्यावे असे धन आणि वैभव तिला मिळाले.

नंतर काममंजिरी मरीचीकडे आली. तिने त्याला नमस्कार केला. आणि ती म्हणाली,

"मुनिराज, नमस्कार. आता येते मी.

म्हणून ती जावयास निघाली—

'आ' वासून मरीची तिच्यामागून जावयास निघणार तो राजसेवकांनी त्याची गठडी वळली. त्याचे वस्त्रालंकार हिसकून घतले आणि त्याची विटंबना करीत व त्याला मारपीट करीत त्याच्या आश्रमाजवळ नेऊन फेकून दिले—

पांथस्था,—

मीच, मीच तो कर्मदरिद्री मरीची ऋषी.

• • •

(दशकुमारचरित. उच्छ्वास दुसरा यावरून संस्कारित)












## एक पुराण-कथा



वर्फाचा वोचणारा गारपणा. त्यावर प्रर्वताची सरळ चढण. वाटलं, पाय गोठून जातील तरीहि स्वतःला ओढीत राहिली. साऱ्यांच्या मागोमाग.

मागे राहाणंच तिला वरं वाटत होतं. देवदाराची उंच-उंच झाडं तिला आपल्या सावली-कुशीत घेत होती. वर्फावर झळाळणारी अभ्रकी सूर्यकिरणं तिच्याकडे पाहून हळूच हसत होती. तिला ते जाणवत होतं.

—पण तोपर्यन्त सारे तिला शोधीत आले.
"कुठे हरवली होतीस ?"
"कुठे ? . . .तुमच्या मागेच तर आहे !"

"रस्ता वाईट आहे. वरोवर चालणंच ठीक !"

"वरोवर चालण्यानं रस्ता चांगला होईल का ?"

"नाही, पण एकमेकांना मदत तर करता येईल !"

'अस्सं !  — ती उपहासानं म्हणाली.

-वाकीचे आजुवाजूची वनश्री पहात होते; पण दोन भेदक डोळ्यांनी तो उपहास टिपला.

ती आता एकटी होती. देवदारांची झाडं उदास झाली होती. उन्हाची किरणं ढगांनी झाकोळून टाकली होती. . .पण तिच्या

## मुक्ती

एकटेपणाचं मोठं कारण होतं, तिच्या अवती-भोवती चालणारे—पाच पुरुष !

त्यातल्या एकाला तीची विमनस्कता जाणवली.

.दमलीस ?"

"थोडीशी."

"थोडी विश्रांती घे."

"उशीर होईल."

"होऊ दे."— आणि तो साऱ्यांना थांववून परत आला.

—सारे जणू इथे-तिथे वसून विश्रान्ती घेऊ लागले. ती एका शिळेला पाठ टेकून वसली होती. त्यावरच तो वसला.

. .उदास दिसतेस !"

"छे.  !"

"काहीतरी तसं वाटतंय ?"

"हो, मला वाटतं वैराग्य घेणं तुला आवडलेलं दिसत नाही."

". . .छे, तसं नाही !"

"मग कुरू-क्षेत्रावरच्या संहाराची दुःखद स्मृती मनात डाचत असेल."

"तो तर नियतीचा खेळ होता."

"मग ?  "

"जरा व्यक्तीगत आहे.

"कुणाचं !"

"दुसरं कुणाचं.  माझंच !"

"  .लपवणार आहेस ? . . .मला—देखिल सांगणार नाहीस ?"

"लपवण्याचा प्रश्न नाही."

"मग मनात कां ठेवतेस ?"

.मी जाणून-वुजून ठेवत नाही. आज, या ठिकाणी, ती गोष्ट मनाला ढवळील असं मला सुद्धा वाटलं नव्हतं !"

"कोणती गोष्ट ?"

"सांगायला वरं वाटत नाही . . .तुम्हाला दुःख होईल."

". . .नाही, तुझं दुःख हलकं केल्यावर,



अनुक्रमणिका

उलट मला वरं वाटेल. तू सांग तर खरं!"

. . युद्धाआधीची गोष्ट आहे, तेव्हा तुम्हा सान्क्षंचा पराजय होत होता. . ."

"ओह, . . .आमच्या यशानं तो पराजय झाकू शकत नाही का ?

"मला नाही सांगता येणार ! मी त्याचा विचारच कधी केला नव्हता; पण आज सारं सोडून निघाले आहे, तर ती आठवण सारखी कोट पकडून वरोवर चालते आहे."

"पण, मनात किल्मिषं ठेवून स्वर्गात प्रवेश करता येत नाही."

"स्वर्गात जाणं नाहीच जमणार."

"असं म्हणू नकोस. तू पुण्यवान स्त्री आहेस."

"मला स्वर्गात जाण्याची इच्छा नाही.

.कां ?"

—तो आश्चर्यचकित झाला.

"तिथं धर्मराज सुद्धा असतीलच !"

"हो, यात काय संशय ?"

—तो अगदी सरळपणानं म्हणाला.

"मी धर्मराजांवरोवर आता आणखी राहू शकणार नाही !

"काय. ?" —तो आश्चर्यानं ओरडलाच.

" .नको, .एक जन्म पुरे झालं, आता आणखी नको".

"शुद्धीवर आहेस ? —त्यानं तिच्या खांद्याला स्पर्श करीत विचारलं.

"हो, . .पूर्ण शुद्धीवर आहे. किंवहुना आजच शुद्धीवर आले. आजपर्यन्त प्रमादात होते. . "

"—काय वोलतेस तू. . ?"

"खरं वोलतेय मी. म्हणाले होते ना मी, ऐकून तुम्हाला दुःख होईल म्हणून !"

"मला वाईट वाटतंय, की चुकीच्या वाजूनं या गोष्टीकडे पहाते आहेस. धर्मराजांना दोष देणं हा अन्याय आहे."

"अन्याय. "—ती हसण्यासाठी थांवली.

". . .अन्याय मी करते आहे. वेड पांघरू नका. तुम्हाला जर मी दोष देत असेन तर सारं काही ठाऊक असून तुम्ही अजाण बनता, त्याचा. . .".

"—कुटुंबाच्या शातन्तेसाठी ते आवश्यक अहे !"

". . .आणि, मनाच्या शांतीसाठी ?"

"मनाची शान्ती या वरवरच्या गोष्टींनी येत नाही!"

"हो, मनाची शान्ती जुगारात हरण्यानं येते. . "

.ओह, तुला कळत नाही,. आम्ही विवश झालो होतो" —

"—तुम्ही नाही, विवश झाले होते धर्मराज ! . . .आणि ठाऊक आहे त्यांची विवशता काय होती?"

"काय ?"

"मनातला कलुषितपणा. !"

"शी; शीः, कां पापभागीनी होते आहेस?"

". . .खरं सांगते आहे. ज्या स्त्रीला प्रेयसी वनवण्यात पुरुष असफल होतो, तिला दृष्टीपुढून नाहीशी करण्यात त्याला एक प्रकारचा संतोष मिळतो. धर्मराजांची हीच विवशता होती. "

## मंगेश कुळकर्णी

" .पण त्यांना तसा भ्रम झालाच कसा ? सर्वांपेक्षा अधिक आदर तर तुला त्यांच्याच वद्दल आहे. !"

". . .हो, प्रेमात आदर असतो. पण, सारा आदर प्रेम असू शकत नाही! धर्मराज ही गोष्ट जाणत होते.

"तुला वाटतंय, त्यांनी तुझा सूड घेतला ?"

"जाणूनवुजून नाही. .अजाणता !"

". . .तू ही गोष्ट मनातून काढून टाक. . ."

"मग मनात राहील काय ? मनाच्या प्रत्येक कोपऱ्यात याच गोष्टीचा धूर भरलाय !"

"—त्या धुरात सुगंध भरता येईल."

"कसला सुगंध ?"

"प्रेमाचा, . . .विश्वासाचा !"

.विश्वास कसला ?"

". . .परमेश्वराचा !"

"—तो माझ्यापाशी नाही का ? . . .

.हो, आहे पण. .पण आश्चर्य वाटतंय. तुझ्यासारखी धीर, निष्ठावान नारी, मनात किल्मिष ठेवून. . . ."

"—हे किल्मिष नाही. हा शोक आहे. एक पुरुष पर्याप्त असतो स्त्रीच्या सान्या व्यक्तीत्वाला खंडीत करण्यासाठी. आणि मी. स्वतःला पाच तुकड्यात विभागून जाऊ दिलं. .

"—पण आमच्या साऱ्या शक्तींना एका सूत्रात वांधलंस !"

.पण निसर्गानं जी शक्ती मला दिली होती, तिचा काय उपयोग केला मी ? आपआपल्या विशेषतांची पारख करण्यात गुंग झालेल्या पाच पुरुषांची पूजा—हाच ना ?"

!"

"तुम्हाला आणखी काही सांगण्याचा अवधी मिळेलसं वाटत नाही मला. .!"

"कां ?"

" .माझा अन्त निकट आला आहे"

* *

आणि खरोखरीच त्या अदृष्य—दर्शिनीनं आपला अन्त जाणला होता.

.तिच्या भोवती पाचही जण वसले होते. एकात प्रियकराची विव्हलता होती. दुसऱ्याला व्यथा होती. दोघे शोकातुर झाले होते. आणि जो सर्वात निकट वसला होता तो अगदी शान्त होता. त्यानं हळुवारपणानं तिच्या मस्तकावरून हात फिरविला. आणि सर्वांकडे उपदेशकाच्या मुद्रेनं पहात विचारलं,

"हिला मृत्यू—कष्ट कां पडताहेत, ठाऊक आहे ? "

—सारे जण उत्सुकतेनं उत्तराची प्रतीक्षा करीत होते.

. . .कारण तिच्या हृदयात स्वधर्म पाळला गेला नाही. ! "

.पण धर्मराज, ही तर अत्यन्त कर्तव्यपरायण होती ! —भीमाचा कंठ दाटून आला होता.

"तिनं पाच पतींचा स्वीकार केला होता . . .पण प्रेम मात्र एकावरच केलं. . ."

धर्मराजानं आकाशाकडे दृष्टी लावली.

—अर्जुन नतमस्तक झाला.

. .आणि—प्राणांना अडवून धरणारी जगण्याची इच्छा हळूच दूर सरकली.

स्वर्गात जाण्याचे कष्ट न घेता, पंच-तत्त्वांच्या बन्धनातून प्राण मुक्त झाला.

● ● ●










एक ‘मालवणी’ विनोदकथा

# शिर सलामत तो....



रमण माळवदे

मी दवकत दवकत ऑफिसात प्रवेश केला. खुर्चीत वसलो आणि कागदाची चाळवाचाळव करायला सुरवात केली. तोच खिऽखिऽखिऽखीऽऽ असा कुचेष्टापूर्ण सांघिक हास्याचा लोट माझ्या कानावर आला.बाजूला वळून पाहिलं तोच सौ. भोपळे कु. मोटवानीकडे पाहात म्हणाली, ‘इसकी ओर देखो’ तोच ती ‘ओ माय गॉड’ म्हणत आश्चर्य व्यक्त करती झाली. दुसऱ्या कोपऱ्यातून कु. प्रेमा ओतुरकर—चाळीस गोईंग ऑन टू एकेचाळीस ओन्ली — ओरडली ‘अय्या खरंच !’ सौ. तिरसटकर सौ. भोपळेला म्हणाली, ‘घरच्याघरीच विनापाण्याने केलेली दिसते.’ इतक्यात कु. मोटवानी ओरडली, ‘लेकिन किसने काटा ?’ सौ. भोपळे यांनी स्पष्टीकरण केलं, ‘अरे ओ हमारेमे चानी रहती है न उसने उसका बाल कुरतड्या ऐसा मालूम होता है’ ‘अय्या होय ग होय’ सौ. तिरसटकरानी आपली अनुमती दर्शविली. ‘लेकिन हमारे पाससे दो दो आना मांगता तो हम देते’ औदार्यमूर्ती कु. ओतुरकर.

आता या चार भगिनींना आमच्या ‘वालभादरायण’ समारंभाचं प्रयोजन काय होतं ते कसं सांगत वसणार ? कारण ते सांगायचं म्हणजे घुसडसन अ‍ॅण्ड घुसडसन नावाच्या फॉरेन कंपनीत अर्ज केला होता, इतकंच नव्हे तर इंटरव्ह्यूचा कॉल आला होता आणि मी जाऊनदेखील आलो होतो. आता नोकरी केव्हा मिळते त्याची वाट बघतोय.

म्हणजे त्याचं असं झालं, मला दुसऱ्या दिवशी इंटरव्ह्यूला जायचं होतं म्हणून मी अगदी अपटुडेट फॅशनचे कपडे तयार ठेवले होते. आठवड्यातून दोनदा दाढी करायचा माझा क्रम असूनसुद्धा त्यादिवशी संध्याकाळी उशीरात उशीरा जाऊन दाढीकेसांचं जोमाने वाढणारं रान उतरून टाकायचं म्हणून हा कार्यक्रम जवळच्या सलूनमध्ये उरकून घ्यायचं ठरवलं. आम्ही राहतो ती कॉलनीही नवीन आणि ‘एवन’ हेअर कटींग सलूनही नवीन ! त्यामुळे इतक्या स्वच्छ नवीन सलूनात हे काम उरकून घेणे कुणालाही आवडलं असतं. सिनेमाच्या रांगेत तास न् तास उभं राहणं आणि सलूनात ताटकळत वसणं ह्या दोन गोष्टींचा मी उगीचच धसका घेतला आहे. त्यामुळे ज्या सलूनात रिकाम्या खुर्च्या दिसतील त्याच सलूनात जाऊन मी केसप्रदान कार्यक्रम उरकतो.

इंटरव्ह्यूला जायचं होतं त्यामुळे आज सलूनला भेट देणं आवश्यकच होतं. मी ‘एवन’मध्ये प्रवेश केला तेव्हा संध्याकाळचे ७.३० झाले होते. सलूनात दोन खुर्च्यावर दोन कारागिर काम करीत होते. दोन खुर्च्या साफ रिकाम्या होत्या. मी दार उघडून आत डोकावतो तोच ‘या’ ह्या नम्रतापूर्वक शब्दानी मला काबीज केलं. एरवी कचकन अंगावर ओरडणारा कारागीर ‘या’मध्ये एवढी मार्दवता कशी भरतो ही एक आश्चर्याची बाब आहे. दुसऱ्या खुर्चीतल्या माणसाने नुसतं स्मितहास्य केलं. अर्थात ते मी आलो म्हणून केलं





अनुक्रमणिका

का हसताना आपण आरशात कसे दिसतो ते पाहण्यासाठी केलं ते त्याचं त्यालाच ठाऊक !

माझ्याआधी दोन खुर्च्यांवर लहान मुली बसलेल्या होत्या. एका महाराष्ट्रीयन गृहस्थाच्या त्या दोन्ही मुली सलून सुरू झाल्यापासून तिथेच वॉवकट करून घ्यायला यायच्या हे तिथल्या त्यांच्या वागण्यातील सफाईमुळे लक्षात आलं. मला 'या' म्हणणारा तो माणूस त्यांच्याशी लाडिकपणे बोलत होता.

'तुम्हाला गाणी म्हनता येतो ?'

'हो' त्या मुलीने उत्तर दिलं.

'तुमच्या मदरलावी येतं ?'

'नो. मॅडम टॉट अस'

'मॅडमने शिकवलं ? मडम यंग काय ओल्ड ?'

'यंग. वुइ लाईक अवर मॅडम व्हेरी मच. नो मिना ?' तिने दुसऱ्या खुर्चीवर बसलेल्या आपल्या बहिणीला विचारलं.

'मी तुमच्या स्कूलमधी येऊ ?' हे आणि अशासारखे काहीतरी प्रश्न विचारून तो कारागीर त्या मुलींची करमणूक करीत होता. फाटक्या इलस्ट्रेटेड विकलीची पानं चाळत त्यांचं बोलणं मी ऐकत होतो. केस कापून झाल्यावर तो बाहेर गेला. त्याने तीन चॉकलेट घेतली. एक आपल्या आधी पानानं भरलेल्या तोंऱ्यात टाकलं आणि दोन त्या मुलींना दिली. त्यांना 'गुडनाईट' करून पुन्हा एक पान खाऊन आला. त्याच्या खुर्चीवर माझाच नंबर होता. आता मी एकमेव गिऱ्हाईक उरलो होतो. 'साहबका काम होनेतक मैं आता हूँ' असं म्हणून दुसरा कारागीर बाहेर निघून गेला. 'हे आमचे शेट. हाय यंडुगुंडु' त्याने बाहेर गेलेल्या माणसाची माहिती दिली.

'आता हे मारून येणार' ओठाकडे आंगठा दाखवीत तो म्हणाला आणि पांढरं कापड माझ्यावर टाकलं.

'वरचे केस जरा बारीकच करा हं !' मी सुचविलं.

'ऑ ! राहूं द्या ना तसेच. तनुपकुमार-टायप वाटतात तुमचे केस'

'पण मला बारीकच हवे आहेत' त्या घुसडसन ॲण्ड घुसडसन सारख्या इंग्लीश फर्ममध्ये मी तनुपकुमारसारखा दिसून चालणार नव्हतो हे त्याला सांगण्यात अर्थ नव्हता.

'बरा बरा. तुम्ही म्हनतासा तर करतो. पण सायब पावसाच्या दिवसात केस वाढले की खाज सुटतो, उवाबी होतात'

'अगदी झिरो नंबरची मशिन मारलीत तरी चालेल' मी.

'अँहँहँ ऽऽ कायतरीच काय ! आमीबी मानूस बगून केस कापतो. तुम्ही किती लंवरमधी व्हता सायब ?'

'मी सत्तरमध्ये'

'असा ? मग कधी येवास नाय.' हा कारागीर मालवणीमिश्रीत मराठी बोलत होता. त्याचं माझं जमायला काहीच हरकत नव्हती.

'तुमचा घर खंय ?' मी.

'मालवनाक. तुमचां ?'

'ते बाजूकच'

'तरीपण'

'साळशी' मी.

'हाहा. साळशीचे लोक आळशी नाय हो सायब ? ' आता अनायासे मी आळशी असल्याचा शिक्का त्याने माझ्यावर मारला होता.

'मला वाटलांच. आपल्याकडला मानूसच येगळा गमतो' माझ्यामध्ये असं कोणतं वेगळेपण त्याला दिसलं हे मी आरशात पुन्हा पुन्हा पाहात होतो. 'सायब ह्या कॉलनीमधी आपल्याकडली मानसां लय. मी हेय आसंय म्हनून तर मानसां तुटान पडतत माझेवर. नायतर ह्या यंडुगुडुंका कोन ×× ×आमाला मानसांचा प्रेम. चांगला मानूस गमला की आमाला आनकी काय व्हयो.'

'अहो पण कळीचा कट फारच वर घेतलात' मी चुकचुकत म्हटलं.

'तेकां काय नाय होयत. मी करतंय बरोबर. आजून वस्तरो लागलो नाय हा.' त्यान मी दाखविलेल्या चुकेचं समर्थन केलं.

'तुम्ही या सलूनात कधीपासून आहात ?' मी.

'मी ना ? उद्घाटनाकच होतो. सव्वीस जानेवारीक उद्घाटन केला. फीत मीच कापली म्हननास. अगदी हेच कात्रीनं' असं म्हणून हातातील कात्रीचा कचकच असा आवाज त्याने काढून दाखविला. परेलला हेचाच आनकी एक सलून हाय. तिथे मी बरेच वरसां हाय. मला म्हनाला तुमी नव्या सलूनात चला. इंगीत हा तां. परेलला हातांक याम आसतां.' गेली पंधरा मिनिटी मानेवर ट्रॅक्टर फिरावा तशी मशिन कैंचीची करामत तो माझ्या मानेवर करीत होता त्यामुळे त्याच्या हाताला यश नाही असं मी तरी कसं म्हणू धजलो असतो ?

'गावी कधी गेला होता ?' मी सहज विचारलं.

'हाली दोन म्हयने गावीच होतो. आता आलो. आठ दिवस झाले. गावी शेतो हाय. मला सुतारकाम बी येतां.'

'वाटलंच मला'

'आपल्या हातात चौसष्ट कला हत. खंय उपाशी मरनार नाय' तो आपली अंदाजे एकतीसच्या आतबाहेर असलेली छाती पुढे काढीत म्हणाला.

'ते चांगलं आहे' मी काहीतरी बोलायचं म्हणून बोललो.

'मी येनार नसतो एवढ्यात सायब. पन हेना मेल्यांन तार केल्यान इमिझेटली रवानगी कर म्हून. गुटाळलंय आणि दुसरे दिवस चलत सुटलंय. व्हतां काय. गिऱ्हाइक लोक वाट बघतो ना ! व्हयते पस्तीस लंबराच्या बिडलींग मधी एकजून नाटक शिकवनारो लेक्चर हां. माझेशिवाय केस नाय कापनार'

'अरे वा ! असं पाहिजे' मी माझ्या वतीने त्याला शाबासकी दिली. 'आमचा जमता तेचेबरोबर. मी बी नाटकात काम करतो. कुठलाबी. राजाचा आसो नाय तर गड्याचा' त्याने मला आणखी एक आश्चर्याचा धक्का दिला.








'दचकलासे ?'

'छेछे ! दचकलो नाही. पायाला मुंग्या आल्या म्हणून हालचाल केली. केस झाले ना कापून ?'

'थांबा हो. सावचितानं काम करू या'

'पण माझ्या पाठीला सणक भरली' मी माझं दुःख बोलून दाखविलं.

'त्याला बी उपाय हाय' असं म्हणून त्याने आपल्या हाताचा मघाशी दाखविलेला तो आंगठा माझ्या मानेपासून माकड हाडापर्यंत असा काही दावला की 'ओय' अशी किंकाळी मारून मी खुर्चीत वळवळलो.

'आता वाटलां की नाय शाफ ?'

'होय, अगदी साफ वाटलं. आटोपतं घेता ना ?' मी.

'आता होयंत. पन आपलो विषय ख्यापर्यंत इल्लो तो ?'

'नौसष्ट कला' मी त्याच्या आंगठ्याकडे पाहात म्हणालो.

"छ्या छ्या. तां नाय हो. नाटकाचा सांगत होतो. एकवरीस दहकाल्याक 'वीर बब्रूवाहान' आमच्या आवाटकरांनी वसवल्य.नी होता. राजाचा काम मी केल्लंय. इन्ट्रीकच असा वाक्य ठेवन दिलय, 'परधानजी अस्वशाळा, गज्वसाळा आनि मेघसाला हेंची येवस्था खंयच्या परकारानी ठेवलेली हां' ह्या वाक्य असा काय फेकलंय-बेंबीच्या देठापासून आनि दादा माझ्या परधानजी टराकलो. राजाचा काम तां स्टेजवर इल्यार आप्रेशन पडला माझा.

'ऑपरेशन ?'

'हा. आपरेशन' तो ठासून म्हणाला. टेंपरवारी राजा झालो म्हनू काय झालां ? जोर होयो ना त्याच्यात कसा ?'

'अगदी बरोबर.' मी खुर्चीतच वळून त्याची पाठ थोपटली.

'अवो हालीचा काय राजकारन हां या ? ह्यो हिजडखानो. वायलमानुस राज्य करतला ? आज रशियाक, उद्या अमेरिकेक उंडगत न्हवार्‌यचा कायब म्हना तुमी पन सम्यबाचा राज्य तां राज्य. आमका काय देशाचो अभिमान नाय असा नाय. ह्या वस्तऱ्यानं शत्रूक नामोहरम करीन. पन काय दम नाय ह्या राज्यात. अवो मी तुमचो खून करतंय आनि निर्दोस सुटतंय. ह्यां काय ? घासभर अन गरीबांक मिळता हां ? चोरांचा फावता. तुमका मी बोलतंय तां कटू वाटात ?'

'छे छे !' मी.

'तोंडापुरता बोला नुको. आपला म्हनजे ह्यो सूर्य आनि ह्यो जयंद्रथ कसा ? '

'अगदी बरोबर' माझा सूर.

'केस बघा' राजाने फर्मान सोडणारा लखोटा हाती धरावा अशा थाटात त्याने आरसा दाखविला. केस कसेही असते तरी वाईट म्हणायला मी धजलो नसतो.

'दोन म्हयने वगूक नुको' तो माझा गाववाला असल्यामुळे बारीक केस करून त्याने माझ्या पैशाची बचत केली होती.

'बरं, आता दाढीचं बघता ना ?' मी भितभित विचारलं.

'होय. आता येळ नाय लागनार' असं म्हणून त्याने सावणात ब्रश बुडवलं आणि माझ्या दाढीवरून हात फिरविला.

'सायब, तुमी हातांन दाढी करतासा ?' त्याने पृच्छा केली.

'होय'

'नासला काम' तो ओरडला.

'काय नासलं ?' मी तावडतोब विचारलं.

'अवो हाबानं दाढी केलास तर पुढे बाँब मारूची पाळी येयत. दाढी अशी राकट होयत की मगे म्हातारपनी चार हात फाटात' त्याचं हे वाक्य ऐकल्यावर माझं म्हातारपण याची देही याच डोळा मी समोरच्या आरशात पाहिलं. 'मिया नुको. दाढी करूकंच होयी. ती एक खोड हा मानसाची बाईक वाहात्तर खोडी आनि पुरषांक त्रेहात्तर खोडी.' माझ्या ह्या कारागीर मित्राने हा एक अचाट शोध लावला होता. बोलता बोलता त्याने माझ्या दाढीला सावण लावला. 'सायब जावन येतंय हां. ' असं म्हणून तो दार उघडून बाहेर गेला तो वरोबर दहा मिनिटं गुल. तोपर्यंत आमचं घोंगडं तसंच भिजत पडलं होतं.

'पान खावंक म्हणून गेल्लंय. ती अकस्मात गर्दी दिसली पुढे गेलंव. इंपाला. लांबलचक. आमचो हिरो गेलो.

'कोण ?' मी प्रश्न टाकला

'वर बघा' तो.

मी वर पाहिलं. भिंतीला वरच्या बाजूला निरनिराळे सिनेमा नटांचे फोटो होते.

'होय तो मधलो फोटो दिसतां ना तो आमचो हिरो. तनुपकुमार. तुमी 'झापडकी ऐट' सिनेमा बगलास की नाय ? बावनावो आठवडो हा. मी सहा येळा बगलंय. आमच्या हिरोचा काम कसां हा ?'

'काम ना ! वा. चांगलं काम केलंय त्याने !'

'काय तेचा बोलना. पर्शानिटी काय. आपून तर तेचेर जीव ओवाळून टाकलो. एवन कसा ?'

'हो न. बरं, आता हात उचला. मला गेलं पाहिजे' तोंडात सावण जाणार नाही ही काळजी घेत मी.

'मलावी अजून जेवायचां हा सायब.'

'तुम्ही कुठे जेवता ?'

'होयते वाजूक खाणावळीक. न्हवायला हयंच. सोय सर्व हा. पानी हौसिंग बोर्डाचा. ही पन सोय हा.' असं म्हणून त्याने संडासाचे दार उघडले. 'सोय कशी हा ?'

'उत्तम सोय' मी नाक दाबीत म्हटलं.

आता मात्र त्याच्या कामाला विलक्षण वेग चढला होता. चामडी जास्तीत जास्त खेचून तो दाढी करीत होता.

'हळू हळू' मी पुटपुटलो.

'थांबा हो' माझे खांदे दाबीत तो.

'आई ग ! हनुवटीखाली बोटाने चाचपून मी पाहिलं. थोडं तरी रक्त बाहेर आलंच असणार हा माझा कयास खरा ठरला होता.

'अगदी हलक्या हातानं घ्या. हे बघा रक्त आलं.' मी अजिजीनं म्हटलं.

'थांबा थांबा. त्याने एका कोपऱ्यात जाऊन मातीची चिमटी आणून त्या जागेवर दाबली. मी मनाशी विचार केला हा माझा मित्र मांत्रिक वगैरे आहे की काय !

'माती नुको. तुरटी लावा.' मी कळकळीची विनंती केली.

'खुळे की काय ? मातीत औषधोपचार आसतां. मी टाटा मेमोरिअलमधी होतंय काय दिवस. तुमचे दात दुखत आसले की समजा केस घळणार. दात आनि केसात लय कनिक्शन आसता' अशा रीतीने माझ्या ज्ञानात तो कणाकणाने भर टाकीत होता.

'लहानपणी तुमी मातीत खेळलांस की नाय ?'

'आता तेवढं आठवत नाही'

'तांच म्हनतंय. अवो हे डॉक्टर फाक्टर आता झाले. कापरभेंडीचा पाळ, वाकेरीचा भाता, अडळसो ही आमची औषधां. मग टायफर आसो की तेचो वापूस आसो. मुंबयत हवापानी चांगला नाय त्यामुळा रोग लय. आता आमका खंय अजून धाड भरली हां ?'

'तुम्ही जुनी माणसं. तब्बेत सांभाळून राहता' मी.

'हां, तांच म्हनतो. आता तुमची पन्नाशी जवळ इली. माझा वय किती आसात असा तुमका वाटता ?'

त्याच्या या प्रश्नाने मी संभ्रमात पडलो. तरीपण त्याची प्रश्नार्थक मुद्रा माझ्या उत्तराची वाट पाहात होती म्हणून मी माझा अंदाज दिला ठोकून 'चाळीस ?'

'हॅहॅह. अवो त्रेपन.'

'अस्स ?'

'मगे सांगतंय काय ? आमची हाडा दिसतंत तेचेर जाव नुको.'

'वर आता मी उठतो. दाढीपण झाली.' मला केव्हा एकदा त्याच्या तावडीतून सुटेन असं झालं होतं पण तो मला तिथेच दावून बसवीत म्हणाला, 'जरा थांबा. आज केस कापलास तरी परत येवक व्हयास' असं म्हणून त्याने माझ्या डोक्यावर तेल टाकलं आणि डोकं गजगजायला सुरवात केली. नंतर मान पकडून अशी काही गरगरून फिरविली की मला दाही दिशांचं दर्शन क्षणार्धात झालं.

'पुरे पुरे. आई ग' करीत मी खुर्चीवरून उठलोच.

'माणूस बघून मी येळ घेतो. तुमचा ह्या वाताचा आंग. मळल्यार कसा वाटला ? चांगलंच बरं वाटतय मला आता. हे घ्या पैसे'

'बरा आता येयत र्‍हवा' त्याचा आग्रह.

'हो हो. येईन की.' पैसे टाकून मी कसाबसा घरी आलो. पुढील दोन दिवस माझं शिर धडापासून वेगळं झालं की काय असं सारखं वाटत होतं. दुसऱ्या दिवशी मी इंटरव्ह्यूला गेलो तो साडेशंभर ताप घेऊनच !

* * *

# "दीपावली' १९६९ कादंबरी-स्पर्धेतून निवडलेल्या चार कादंबऱ्या....




प्रतीक्षा • वावर • प्रतिष्ठा • काळोख आणि किरण

या चार कादंबऱ्या चार तऱ्हेच्या; पण काहीशा एकाच साच्याच्या. म्हणजे साच्याचे स्वरूप कथालेखनाच्या दृष्टीने काहीसे सारखे व कथावस्तू मात्र निरनिराळ्या ढंगाच्या व रंगाच्या. हे कथालेखकही वेगवेगळ्या वयाचे, पिढीचे, स्तराचे व भाववृत्तीचे आहेत. सर्वांनाच या कादंबरिका लिहिण्याची प्रेरणा 'दीपावली'च्या कादंबरिका लेखनस्पर्धेतून मिळाली. पैकी प्रभाकर पेंढारकरांची कलाकृती प्रथम पारितोषिक विजेती. या चारही कादंबऱ्यांचा व कादंबरीकारांचा एकत्र विचार करणे मनोरंजक व साहित्यमूल्यांच्या दृष्टीने फलदायक ठरावे.

अनंत मनोहर हे या दशकातलेच नव्या दमाचे व नव्या पिढीचे लेखक. आपल्या एका कथेवरच त्यांनी ही लघुकादंबरी बेतली आहे. एका खलनायकाची कथा. पण पारंपरिक अर्थाने या नायकाला—दत्ताजीला—खलनायक म्हणता येणार नाही. खलनायकत्व त्याच्यावर परिस्थितीने व व्यक्तिविशिष्ट प्रवृत्तीमुळे लादले जाते. जीवनात यशस्वी ठरलेला हा माणूस आहे; पण हे यश जीवनमृत्यूच्या विध्वंसातून व ती मूल्य अव्हेरण्यातून त्याला प्राप्त झालेले आहे. पण माणुसकीला तो अगदीच पारखा झालेला नाही. दत्तात्रेय वर्वेची ही कथा अनंत मनोहर मस्त रंगवून सांगतात. लघुकादंबरीच्या सगळ्या संभाव्य मर्यादा ते पाळतात पण म्हणूनच की काय त्यांच्या सरळसूत्री निवेदनाला वेग आलेला आहे व एकदाचा कथेचा कळस कसा गाठावा याची त्याना घाई झालेली दिसते. कथेतील इतर पात्रांची स्वभावरेखाटनेही बटबटीत व ढोबळ झाल्यासारखी वाटतात. अर्थात् वातावरणनिर्मितीची कला मात्र लेखकाने साध्य केलेली दिसते. एखाद्या लघुकथेसारखीच ही कादंबरी वाचकाच्या मनावर एकच एक परिणाम करते व पुष्कळदा 'कथेची' कादंबरी करण्यात लेखकाने जमविलेला 'फांफटपसारा' कथेच्या कलामूल्यांना उगीचच हिणकसपणा आणतो. या चारही कादंबरीकांमध्ये सातत्याने जाणवणारा अतिरंजितपणाचा व नाटकीपणाचा हव्यास अर्थात याही कादंबरीत प्रकर्षाने जाणवतो. हे खरे असले तरी मानवी स्वभावाचे चोरकप्पे व अंतर्कप्पे नेमके टिपण्याचे सामर्थ्य मनोहरांच्या लेखणीत आहे याचीही रसिकाला प्रचीती येते. याच निकषावर प्रा. ल. ग. जोगांची 'काळोख आणि किरण' ही लेखनकृती मात्र कादंबरीचे एक वेगळे रूप प्रकट करते.

महाविद्यालयीन व विद्यापीठीय स्तरावर (महाराष्ट्र सोडून) देशात आज जो विध्वंस मांडला जात आहे, त्या वास्तव व भीषण पार्श्वभूमीवर जोगांची ही कादंबरिका विशेषच उठून दिसते व नकळतच वाचकाच्या अंतःकरणाचा ठाव घेते. स्वतःच्या महाविद्यालयीन जीवनातून लेखकाने हे अनुभव व ही पाने चिंतनपूर्वक निवडलेली आहेत हे जाणवण्याइतकी ही कादंबरी प्रत्ययकारी झाली आहे. प्राचार्य [illegible]क आपल्या सत्काराच्या (निवृत्त) वेळी मागे वळून जीवनाकडे पहातात व त्यांच्या नजरेसमोर झळाळणारा त्यांचा जीवनचित्रपट म्हणजेच ही दीर्घकथा! ती कधी अवास्तवाच्या काळोखात वावरते तर कधी वास्तवाच्या किरणातून अलिकडे पलिकडे सरकते या कथेतील नव्या जमान्यातील कॉलेज विद्यार्थी स्वभावाचे नमुने धक्का देणारे व वाचकांच्या परंपरागत समजुतीना व सज्ञांना बधीर करणारे आहेत. पुष्कळदा तर ते अपेक्षित वास्तवाच्या कक्षा ओलांडून भयानक विध्वंस व हाःहाःकार माजविणाऱ्या अतिवास्तवाच्या परमविकृत सीमाकक्षांना जाऊन भिडतात. या जीवनदर्शनातील अतिनाटकीपणा म्हणूनच पुनः पुनः खटकतो व तो भडकपणाकडे जाऊन थडकतो. कथानिवेदनाचे प्रा. जोगांचे तंत्र जुनेच व सरधोपट मार्गाने जाणारे आहे. लेखनशैलीचा सूक्ष्म आविष्कार करावयाला अशा तऱ्हेच्या प्रसंग व परिस्थितीप्रधान कथानकात कमी वाव असतो. ही सगळीच पात्रे एका भीषण नाट्याचा दारुण परिणाम साधण्यासाठी लेखक निवेदनाच्या माध्यमामार्फत एका घट्ट व निष्ठुर पकडीतून व पठडीतून सारखी हालवीत असतो. ही कादंबरी म्हणूनच जो अनुभव देण्याचा प्रयत्न करते तो अनुभव जितका दारुण भीषण वाटत रहातो तितकाच तो अतिरंजित व अवास्तवही भासत रहातो. या महाविद्यालयीन जीवनात रोमान्स आहे, त्याग आहे, आत्मशोध आहे. व आत्मविनाशही आहे. मानवी स्वभावाचे उध्वस्तीकरणही आहे व उदात्तीकरणही आहे. हुरहूर लावण्याचे व वाचकाला विलक्षण अस्वस्थ करण्याचे सामर्थ्यही या कथावस्तूच्या मूलप्रकृतीमध्ये आहे. प्रा. जोगांनी यापूर्वीही कादंबरीलेखन केले आहे व तेही तितकेच धक्का देणारे ठरले आहे. जोगांच्या






कादंबरीलेखनाच्या सर्व मर्यादा ज्याप्रमाणे ही कादंबरिका प्रकट करते त्याप्रमाणेच त्यांच्या लेखनसामर्थ्याचे 'किरण'ही ती काळोखातून उजेडात आणते.

प्र. ना. शेणई हे सुद्धा अनंत मनोहरां-प्रमाणे या दशकातीलच आणि नव्या पिढीचे, नव्या दमाचे व ताकदीचे लेखक. 'वावर' ही कादंबरिका लिहून त्यांनी पुनः एकदा वाचकांना अंधेरीच्या झोपडपट्टीत नेले आहे. दादू हा या कथेचा मुख्य सूत्रधार आहे. बाकी प्रसंग, घटना, परिस्थिती व मनुष्यस्वभावाचे दर्शन व वारकावे झोपड-पट्टीवर प्रसिद्ध झालेल्या आजवरच्या अन्य कादंबऱ्यांप्रमाणेच आहेत. इथे झोपडपट्टी हा त्यां त्या लेखकाने आपल्या हातात घेतलेला जणू हुकुमी पत्ता वाटत रहातो. पुनः या झोपडपट्टीतील वास्तव ते नाटची-करणाच्या तंत्रातून व प्रक्रीयेतून पकडण्याचा प्रयत्न करतात, त्यामुळे केवळ जीवन व त्या जीवनामागील मानवी अमानुषता हे सत्य व ही वास्तवता या कलाकृतीतून क्षीण-पणाने "वावर'ते व स्त्रीपुरुषांच्या वैयक्तिक, खासगी व अतिखाजगी लैंगिक संबंधावरच लेखक आपल्या लेखननिर्मितीचे झोत सारखे फेकीत रहातात. त्यांचे 'क्लोजअप्स' देतात. प्रसंगी त्यातून भीषण व बीभत्स नाट्यही निर्माण करतात व पुनः पुनः विचारा कथानायक आपल्या घरादाराला मुकतो, पत्नीमुलांना मुकतो, व पोलिसांचे राक्षसी तडाखे खात तडीपार होतो किंवा जन्मभरचा तुरुंगात जाऊन बसतो. या दृष्टीने 'वावर' ही कादंबरी मराठीत आजवर निर्माण झालेल्या झोपडपट्टी-प्रवाहाचा कसून विचार वाचकाच्या मनात घोळवीत रहाते. प्रवाही कथानिर्देशन, तुटक, त्रोटक, नेमकी वाक्यरचना, संवादाचा स्वाभाविक-पणे साचलेला सुसंवादी सूर आणि उघडे-नागडे अनलंकृत स्वभावरेखाटन यामुळे ही कादंबरिका इष्ट तो परिणाम घडवून आणते व दीर्घकाळ रसिकाच्या मनात 'वावर'ते.

मात्र प्रभाकर पेंढारकरांच्या 'प्रतीक्षे'-कडे वाचक जेंव्हा येतो, तेव्हा तो पहिल्या प्रथमच मराठी वाङ्मयविश्वात आजवर कधीच प्रकट न झालेल्या वेगळ्याच मानवी विश्वात प्रवेश करतो. युद्धाची कथा सर्वांनाच ऐकायला आवडते. परंतु ही कथा जशी भारत व पाक युद्धाची आहे तशीच ती मानवी मनात नेहमीच हाहाःकार माजविणाऱ्या मानवी अंतर्मनातील भीषण युद्धाचीही कथा आहे. शेवटी सैनिकसुद्धा माणसेच असतात. माणसाच्या अंत-र्मनातच कुठेतरी सैनिक, सैतान व संन्यासी वसतीला आलेले असतात याचा एक धावता, दणकट व तरीही भाववृत्ती उध्वस्त व तरल करणारा प्रत्यय पेंढारकर आपल्या या लेखनकृतीतून आणून देतात. प्रभाकर पेंढारकरही या दशकाचेच तरुण लेखक! चित्रपट निर्मितीशी व भारत सरकारच्या 'फिल्म्स डिव्हीजन'शी त्यांचे काका कै. बाबूराव पेंढारकर यांच्यामुळे त्यांचा ऐन तारुण्यातच संबंध आल्यामुळे भारताच्या सर्व भागातून प्रवास करण्याचे व विविध मानवी स्वभाव हेरण्याची व टिप-ण्याची संधी त्यांना विपुलतेने मिळाली. अशाच एका अनुबोधपटाच्या संदर्भात त्यांचा 'पॅराशूट ट्रेनिंग' केंद्राशी जवळून संबंध आला. भारतीय छत्रीधारी सैनिकां-बरोबर दोन महिने राहण्याची संधी त्याना प्राप्त झाली. या कादंबरीकेला लिहिलेल्या "पार्श्वभूमि"त पेंढारकर लिहितात, त्या काळात एक जाणीव झाली की रुबाबदार गणवेष, खांद्यावरचे चकाकते तारे आणि छातीवर डौलाने मिरवणाऱ्या रंगीबेरंगी फिती ह्यांमध्ये दडलेले सैनिकाचे मन सर्वसामान्य माणसाच्या मनाइतकेच संवेदनाक्षम असते. समाजापासून सैनिकांना अलग केलेले असले तरी सामाजिक अथवा राजकीय आघाताचा परिणाम त्यांच्यावरही होत असतो आणि त्यातून समाजाच्या ढवळलेल्या श्रद्धा आणि तडा गेलेली मूल्ये त्यांना आचरण करतात.' या आपल्या कथारचनेचे प्रमुख सूत्र प्रारं-भीच अशा रीतीने पेंढारकर सांगून टाक-तात व त्या सूत्राशी एकनिष्ठ राहात व एक-जीव होत त्यांची कथावस्तू साकार व संजीव होत रहाते. एक छत्रीधारी सैनिकच आपली जीवनकथा–जशी त्या विशिष्ट युद्धभूमिवर घडली – निवेदन करतो. व त्या निवेदनाच्या ओघात तो वाचकाला त्याला अत्यंत अपरिचित अशा युद्धस्थळांवर, वै मानवी वस्तीत घेऊन जातो. ही माणसे व त्यांच्यावर आलेले प्रसंग सर्वसामान्य वाचकाने त्याच्या नेहमीच्या 'सिव्ही-लीयन' सुरक्षित जगात पाहिलेली नसतात, अनुभवलेली नसतात. एकूण पंधरा प्रकर-णात विभागलेली ही कथावस्तू कथानिवे-दनाची गतिमान व विविध परिमाणे लीलया साधते. वाचकाच्या मनाची अनि-वार्य पकड घेऊन ती त्याला कधी लढाऊ विमानातून आकाशात घेऊन जाते, कधी अलगद छत्रीधारी सैनिकाबरोबर विमाना-तून खाली भूमीवर तरंगत सोडून देते, कधी त्याला मृत्यूचे थैमान उघडया रक्तबंबाळ डोळ्यांनी पहायला लावते आणि शेवटी कथानायकाबरोबर तरंगणाऱ्या छत्रीला लोंबकळत रमणीय जादूनगरी बनलेली सृष्टी डोळे भरून (व हृदय भरून) अंतः-करणात साठवायला लावते. त्यालाही कथा-नायकाबरोबरच वाटत रहाते.' 'ह्या विश्वाचा स्वामी मी आहे? . . .त्याला आणखी हेही जाणवते. . (जसं त्या कथानायकाला)

A war brings out the best in man; but, most of the times, also the worst in man.' युद्ध माण-सातील अतिचांगुलपणा उघड करते; परंतु, पुष्कळदा माणसातील अतिवाईट-पणाच प्रकट करते! पेंढारकरांनी उघड उघडच ही कादंबरी चित्रपटलेख-नाच्या दृक्दर्शन तंत्रातून लिहिलेली आहे; त्यामुळे पुष्कळदा ती केवळ कादंबरी न वाटता एखादा चलच्चित्रपटच वाचकाच्या मनोपटावरून वेगाने व आवेगाने सरकत

(पृष्ठ ६६ वर)

#### गोमंतकाच्या मुक्ति संग्रामाचा अखेरचा सेनापती

# डॉ. तेलु मास्कारेन्यस्



गोवा स्वातंत्र्यलढयाचे पर्व आता पूर्ण झाले आहे. मुक्तिसंग्राम समाप्त झाला आहे. गतवर्षी स्वातंत्र्ययोद्धे मोहन रानडे मुक्त झाले तर यंदा डॉ. तेलु मास्कारेन्यस् यांची मुक्तता झाली आहे. गेला महिनाभर त्यांच्या मुक्तीच्या वार्ता येत होत्या. पण त्यांना अधिकृत स्वरूप लाभत नव्हते. पण त्यांच्या पत्नीला त्यांनी पत्र लिहून ही शुभवार्ता कळवली असून ही वार्ता त्या कुटुंबाचीच केवळ नसल्याने साऱ्या भारतीयांचीच ती झाली व सर्वत्र आनंदाचे वारे खेळू लागले आहेत. स्वातंत्र्ययुद्धातली मोहन रानडे व डॉ. मास्कारेन्यस् ही दोन सुवर्णपर्वे होती आणि शल्यपर्वेही होती. गोवा मुक्तीनंतर जर 'व्यावहारिक' भूमिका घेतली गेली असती तर गोवा मुक्तीबरोबरच हे स्वातंत्र्यवीरही मुक्त झाले असते. आणि त्यांच्या देशभक्तीचा व सेवेचा लाभ देशाला पूर्वीच होऊ शकला असता. डॉ. मास्कारेन्यस् आता मुक्त झाले असल्याने ते शल्यपर्वही संपले आहे. तरीही एक दायित्व भारत शासनावर आहे. डॉक्टरसाहेबांना मुक्त केले असले तरी त्यांच्यावर पोर्तुगाल सोडून न जाण्याचे बंधन घातले असून त्यासाठी ते 'पोर्तुगीज नॅशनल' आहेत असा दावा केला आहे. त्यांच्या मुक्तीतले हे लहानसे शल्य भारत शासनाने प्रयत्नपूर्वक उपटून टाकायला हवे. भारताचा हा वृद्ध स्वातंत्र्यवीर येथे येऊ शकला पाहिजे. त्यांची गौरवशाली मिरवणूक आम्हाला काढता आली पाहिजे. जयजयकार करता आला पाहिजे. खऱ्या अर्थाने मुक्तिसंग्राम तेव्हाच पूर्ण होईल.

कुठल्याही लढाईला अनेक अंगे असतात. ह्या साऱ्या अंगांचे सुसूत्रीकरण, नेतृत्व, संचालन जर कुशलतेने केले गेले तर लढाई नीट लढता येते. विजय मिळवता येतो. स्वातंत्र्ययुद्धात पिस्तुले वापरणाऱ्यांइतकेच महत्व प्रभावी प्रचाराचे माध्यम ठरणाऱ्या लेखणीला असते. ह्या साऱ्याच अंगांनी लढा फुलवीत न्यायचा असतो. डॉ. मास्कारेन्यस् यांनी गोवामुक्ती लढयात लेखणी पिस्तुलांच्याच तडफेने वापरली आणि म्हणूनच पिस्तुले वापरणाऱ्या रानडयांना सव्वीस वर्षे तर लेखणी वापरणाऱ्या डॉक्टरांना चोवीस वर्षांची शिक्षा झाली. दयेची संधी मिळाली असताना त्यांनी ती नाकारली. ही मानी माणसे एखाद्या भूभागाच्या मुक्तीचे अग्रदूत नसतात. त्यांना मुक्त मानवाचे स्वप्न मोहवीत असते. डॉ. मास्कारेन्यस् यांची सारी वर्तणूक त्या जातीच्या सेनापतीची आहे. प्रकृतीची पळवाट काढून रणातून पळून येणाऱ्या पळपुटया व चामडीबचावू दे. म. ( ? ) पेक्षा डॉक्टरांसारखे सेनापती नवे आदर्श निर्मू शकतात. त्यांची नावे प्राप्त कालाच्या विशाल भूधरावर कायमची कोरली जातात. त्यांचा जयजयकार गगन भेदून जाऊ शकतो. त्यांची फुले कधी कोमेजत नाहीत.

'डॉ. मास्कारेन्यस् प्रकृतीने व वयाने खचले आहेत. ते मुक्त झाले पाहिजेत. भारतात आले पाहिजेत' असा ध्यास मोहन रानडे यांनी लावून घेतला. आपल्या प्रत्येक सभेत त्यांची आठवण त्यांनी दिली. वातावरण निर्माण केले. 'सतीचे वाण' प्रकाशन प्रसंगी मास्कारेन्यस् मुक्ति समितीच्या कार्याची पुन्हा घोषणा झाली. अनेक लहानमोठी चाके फिरली. रोमच्या पोपपासून ते मालावीच्या पंतप्रधानापर्यंत आणि लॉस एंजल्समधील एक लक्ष सह्यांपासून ते अॅम्नेस्टी इंटरनॅशनलपर्यंत अनेक प्रयत्न झाले. डॉ. मुक्त झाले आहेत. त्यांची पत्नी भारतात–गोव्यात आहे. नेत्रांची निरांजने घेऊन ती त्यांच्या स्वागताची वाट पहाते आहे. 'सतीचे वाण'च्या प्रकाशनप्रसंगी त्या मुंबईत आल्या होत्या. धीरोदात्त पुरुषाची धीरोदात्त पत्नी असल्याचा प्रत्यय त्यांनी दिला. एक तप तर त्यांनीही केले आहे. त्यांनीही ह्या देशाची मुक्तीची पूजाच बांधली. आता मुक्त झालेले ओरक्त पति घरी येतील, त्यांना आपण विरहाच्या दिसामासांची जपलेली सुगंधी फुले अर्पण करू अशा अनेक स्वप्नात त्या न्हाऊन निघत असतील. हे स्वप्न साकारले पाहिजे. डॉ. तेलु मास्कारेन्यस् हे भारतात आले पाहिजेत. जनता व शासन यांचे ह्या एका विषयावर संपूर्ण एकमत आहे. शासनाने योग्य ती पावले टाकली पाहिजेत. जनतेनेही ही मागणी करीत राहिलं पाहिजे. डॉ. तेलु मास्कारेन्यस्, ऐस्सा मास्कारेन्यस्, मोहन रानडे व ह्या मुक्ति प्रयत्नातल्या साऱ्यांचेच कृतज्ञतापूर्वक अभिनंदन.

—आदित्य



## गंभीर विषयावरचे बोल्ड नाटक

## प्रीती परि तुजवरती

इंडियन नॅशनल थिएटरने मराठी रंगभूमीवर सादर केलेले नवे नाटक पाहण्याचा योग नुकताच आला. 'प्रीती परि तुजवरती' हे नाटक 'दोन अंकी धक्कांतिका' अशी प्रस्तावना करून सुरू होते. ह्या नाटकात वैवाहिक जीवनातल्या एका मूलभूत अशा अनुभव सत्यावर बोट ठेवण्यात आले असून 'एकपत्नीव्रत' हेच कसे धर्म्य व तर्कसंगत आहे हे पटवून देण्याचा प्रयत्न आहे. ह्या गंभीर विषयावरचे हे नाटक मात्र तसे गंभीर नाही आणि हलकेफुलकेही नाही. परस्परांवर विश्वास असलेल्या, प्रेम असलेल्या, मुलांचेही सुख लाभलेल्या मध्यमवयीन कुटुंबात जेव्हा अचानक एखाद्या सुंदर, तरुण व धाडसी वृत्तीच्या स्त्रीच्या रूपाने एखादे वादळ चालून येते तेव्हा एरव्ही शांत व संयत असे जीवन जगणारी ही नौका कशी संकटात सापडते. त्यातून तिची सुटका कशी होते हे सांगण्याचा प्रयत्न ह्या नाटकात आहे. अतिशय बुद्धिमान, स्वत:वर व एकमेकांवर खूप विश्वास असलेल्या माणसांच्या जीवनात हे घडते हे दाखविण्याची कल्पना पटली. तसेच मुलगी शोभेल अशा मुलीच्या रूपाने हे वादळ येते हे दाखविण्यातला नाट्य–न्याय मला तरी रुचला, पटला. प्राध्यापक जयंत क्षीरसागर व त्यांची सुविद्य पत्नी प्रा. डॉ. श्रद्धा क्षीरसागर ह्यांना लंडन येथील वास्तव्यात भेटलेली डॉ. रे यांची मुलगी क्षिप्रा रे त्यांच्या घरी येते. आणि जयंत क्षीरसागार यांना सरळ "मला तुमच्या मुलाची आई होण्याची इच्छा आहे. तुमच्यापासून मला मुलगा व्हावा अशी माझी इच्छा आहे", अशी काहीशी लोकविलक्षण मागणी करते. त्या मागणीने प्रा. क्षीरसागार हादरतात. ती कारण सांगताना म्हणते "तुमच्यासारखा हुशार आणि माझ्यासारखा सुंदर असा मुलगा हवा." त्यावर "नेमकं उलटं झालं तर?" असा सवाल क्षीरसागर करतात. पण पुढे हा बुद्धिमान, विलक्षण प्राध्यापकही क्षिप्राच्या सौंदर्याने आणि तारुण्यसुलभ अशा विभ्रमांनी मोहित होतो. प्रत्येक गोष्टीचे 'तत्वज्ञान' करीत तो एकेक पाऊल खाली येतो. आणि शेवटी पुरुषसुलभ स्वामित्व, कल्पना, मत्सर, एकाकित्व यामुळे तो आपल्या पत्नीचे मोठेपण मान्य करतो. आणि एकपत्नीव्रतावर आपली 'श्रद्धा' असल्याचे प्रेक्षकांना सांगून श्रद्धेचे हात हाती घेतो. असे हे लहानसे नाटक.

ह्या नाटकाची मूळ कल्पना परकीय असली तरी 'चार दोन जागा' सोडल्या तर हा "विदेशी वास" रसभंग करीत नाही. हे नाटक पहात असताना आचार्य अत्रे यांच्या 'लग्नाची बेडी' ह्या नाटकाचे सतत स्मरण होत होते. तर "तुझी बुद्धिमत्ता आणि माझं रूप घेऊन येणारा मुलगा हवा" असं ती म्हणते तेव्हा जॉर्ज बर्नार्ड शॉ यांच्या जीवनातल्या त्या प्रसिद्ध किस्स्याची आठवण होते. शॉ मिश्किल वृत्तीचे होते. त्यांना एका स्वरूपसुंदर सिनेमा नटीने नेमके हेच म्हटले होते. आणि शॉनीही "माझे रूप आणि तुझी बुद्धिमत्ता" हेच उत्तर दिले होते. लग्नाची बेडी नाटकातली रश्मी डॉ. कांचनसकट अनेक पुरुषांना खेळवते आणि मग 'स्त्रियांनो, आपला शृंगार सांभाळा' असा संदेश देऊन निघून जाते. या नाटकातली क्षिप्रा रे मध्यमवयीन प्रा. जयंत क्षीरसागर यांना नादी लावते तेव्हा पुरुषसुलभ वृत्तीने ते तिच्या नादी लागतात. तो खेळ चालत राहतो. पण नाटक पहात असताना अधुनमधून होणाऱ्या 'टेबल टॉक'मुळे मात्र एक 'फीलिंग' रेंगाळत राहते की हे सारे नाटक श्रद्धा व जयंत क्षीरसागर मुद्दामच घडवून आणताहेत. त्या टॉकमुळे ते नाटक कुठेही 'डीप' जाऊन भिडत नाही. नाटकाचा तर गतिरोध होतोच पण जे समोर चाललेले आहे तेही लोक मग फार 'लाइटली' घेतात. ते नाटक होते की क्षिप्राची ती उत्कट भावना होती? प्रा. जयंत जे वागले ते नाटक म्हणून की ते खरोखरच मोहित झाले, चळले म्हणून? प्रा. विद्या वैद्य याचे स्नेहशील नाते जयंताला ठाऊक होते, असले पाहिजे असे दिसते. मग पुरुषसुलभ मत्सरात तो स्नेह पूर्वीच का संपला नाही? निदान त्या दोघात अंतराय तरी का निर्माण करू शकला नाही? त्या दोघात उत्कट प्रीती होती, परस्पर विश्वास होता असे गृहित धरले तर अखेर पत्नीचे मोठेपण पटले म्हणून क्षिप्रेला निरोप देण्यात आला असे का दाखविण्यात आलेले नाही? क्षिप्रेच्या त्या मागणीमागे काही मानसशास्त्र उभे केले गेले असते तर तिच्या व्यक्तिरेखेला अधिक 'ग्रेस' आला असता. प्रा. विद्या वैद्यांनाही योग्य न्याय मिळाला आहे असे वाटत नाही. 'टेबल टॉक' काही मर्यादेत बरा वाटतो. मग रसभंग करतो. नाटकाची एकूण गति त्यामुळे खंडित होते.

[ पान ६३ वर पहा ]



अनुक्रमणिका

# टॉम ॲण्ड बे
# तांबे
## रौप्य महोत्सवी वर्ष



"दाक्षिणात्य माणूस प्रारंभशूर असतो" "मराठी माणसांना धंद्याची नस गवसत नाही" वगैरे विधाने नेहमी वा अधुनमधून कानी येतात. त्यासाठी काही उदाहरणेही मोठ्या हिरीरीने सादर केली जातात. ती खोटी वा चुकीची असतात असंही नाही. पण उदाहरणांनी नेहमी 'संपूर्ण सत्य'च सिद्ध होते असे नाही. कारण उदाहरणे हा काही एकपक्षी व्यवहार नाही. दुसरा पक्षही ही लपली-लपवलेली पाने पुढे करू शकतो.. आणि मग 'हेही खरे आणि तेही खरे' असं म्हणण्याचा प्रसंग येतो. धंद्याची नस घट्ट पकडून ठेवून फायद्याचे अचूक निदान करणारे अनेक "धंदा–धन्वंतरी" आता सुदैवाने महाराष्ट्रात हयात आहेत. "जमाना बदल गया है" याची ग्वाहीच जणु ती माणसे व त्यांचे उद्योग-धंदे देत आहेत. अशा यशस्वी धंदा–धन्वंतरीत पुण्याच्या 'टॉम ॲण्ड बे'चे कर्तबगार मॅनेजिंग डायरेक्टर श्री. गणेशराव तांबे यांचा समावेश सहज करता यावा असे कर्तृत्व त्यांनी सिद्ध केले आहे. टॉम ॲण्ड बे ह्या नावामुळे (गोड) फसवणूक होत असली तरी आपल्या आडनावाचा असा सुरेख, कलात्मक 'बनाव' उभा करण्यात तांबे यांची रसिकता, कलात्मकता व व्यवहारिताच सिद्ध होते. 'नस सापडली' असं मी म्हणतो ते ह्या अर्थाने ! गणेशराव तांबे यांच्या 'टॉम ॲण्ड बे'च्या व्यवहारात केवळ कलात्मकता वा रसिकताच नाही. चिकाटी, निष्ठा, अचूक व परिपूर्ण ज्ञान, आत्मविश्वास, गोड बोलणे, रीतीचे (डीसेंट) वागणे वगैरे अनेक गोष्टींचा समावेश आहे. ज्यांना नस गवसते त्यांना यश गवसते. ज्यांनी 'श्री' मनापासून गिरवली असेल अशांना यशःश्री माळ घालते. तांबे यांनी दोन्ही गोष्टी निष्ठेने व चिकाटीने साधल्या आणि म्हणूनच प्रारंभशूरांच्या ह्या प्रांतात "टॉम ॲण्ड बे" आपला रौप्यमहोत्सव साजरा करण्यासाठी दिमाखाने उभी आहे. तांबे यांचा आणि आमचा स्नेह किती तरी वर्षांचा ! स्नेहशील तांबे आतिथ्यशील आहेत. रसिक आहेत. कला आणि कलावंतांची बूज राखणारे आहेत. आपला मानल्यानंतर 'आपले'-पणाला जपणारे व खतपाणी घालण्यात कुचराई न करणारे आहेत, दिलखुलास, उमद्या मनाचे ते आहेत. केवळ मित्र म्हणून नव्हे तर धंद्याची नस सापडलेला यशस्वी मराठी माणूस म्हणून मला तांब्यांचा आणि "टॉम ॲण्ड बे"चा अभिमान वाटतो. जाहिरातीच्या धंद्यात देशी विदेशी कंपन्या पुष्कळ आहेत. ज्येष्ठ आणि श्रेष्ठ अशाही त्यात आहेत. स्पर्धेला क्षेत्र मोठे म्हणजेच आव्हानही मोठे ! आव्हान जिद्दीने स्वीकारून तांब्यांनी 'रौप्य महोत्सवी वर्ष' गाठले. लवकरच आपला हा व्यवसाय अधिक अनुभवाने परिपूर्ण व्हावा या उद्देशाने ते जगाच्या प्रवासावर निघणार आहेत. इंग्लंड, जर्मनी, जपान, अमेरिका वगैरे देशांना भेटी देणार आहेत. श्री. तांबे यांना या निमित्ताने शुभेच्छा व्यक्त करून त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. तसेच श्री. तांबे यांचे 'टॉम ॲण्ड बे'मधील सहकाऱ्यांचेही मनःपूर्वक अभिनंदन. असेच यश मिळवीत रहा अशी सदिच्छा !

—संपादक

---

( पान ६१ वरून )

श्री. आत्माराम भेंडे ( प्रा. जयंत ) सौ. सुमन धर्माधिकारी (श्रद्धा) मुकुंद कोठारे (विद्या वैद्य) व पुष्पा भोसले (क्षिप्रा रे) ह्या साऱ्यांनीच आपापली कामे सुरेख वठविली आहेत. भेंडे यांचे भावदर्शन मोहक चेहरा व आवाज हुकमतीतला. गंमत आणतात. त्या मानाने सुमन धर्माधिकारी गुणी व कुशल अभिनेत्री असूनही ह्या नाटकात त्यांना वाव कमीच ! पुष्पा भोसले ही नवी अभिनेत्री नुसतीच देखणी नाही तर गुणी आहे. तिचे डोळे, चेहरा बोलका आहे. भावदर्शी आहे. तिची वागण्या-बोलण्यातली सफाई कौतुकास्पद आहे. मराठी रंगमंचाला एक चांगला लाभ झाला आहे. मुकुंद कोठारे हे कसबी कलाकार. पण वाव कमी आहे त्यात ते न्याय देतात. नेपथ्याची बाजू चांगली. दिग्दर्शक भेंडे व लेखक राजाराम हुमणे यांचे अभिनंदन ! तेवढं जरा 'टेबल टॉकच' बघा !

— चित्रगुप्त










## एक (राजकारणी) एरंडाचे गुऱ्हाळ

शतके लोटली, शाह्या पातशाह्या आल्या, लुप्त झाल्या, स्वराज्याचा ध्वज रायगडी फडकला, अटकेपार त्या झेंडयाचा जयजयकार घुमला. राज्ये मिळविणारांच्या कमनशीब आणि कमअक्कल अवलादीने आपल्याच हाताने स्वराज्याचे निशाण फेकून दिले आणि साहेबी निशाण देवाचे निशाण असावे अशा थाटात प्रतिष्ठापित केले. झोप उडाली. क्रांतिप्रयत्न झाले. सत्याग्रह झाले. आणि १९४७ साली भारत जातीय तत्वावर खंडित झाला व मुस्लिम बहुसंख्येचे प्रांत पाकिस्तानमध्ये गेले. जे गेले नाहीत त्यांचा वाद अजूनही संपलेला नाही. जातीय दंगे झाले. वित्तहत्या व मानवहत्या झाली म्हणून हा प्रश्न कायमचा निकालात काढण्याच्या भावनेने ह्या देशाची अशास्त्रीय, अवास्तव, अतार्किक फाळणी मान्य करण्यात आली. आणि ती केल्यानंतरही ती 'जातीय' तत्त्वावर स्वीकारण्यात आली नाही असा आभास उत्पन्न करण्यासाठी बॅ. जिना ह्यांच्या लोकसंख्या अदलाबदलाच्या कल्पनेला 'फॅण्टॅस्टिक नॉन्सेन्स' म्हणून हिणविण्यात आले व आपले शास' निधार्मिक (वा अधार्मिक याने सेक्युलर) असल्याची द्वाही फिरविण्यात आली. ज्या लाखो लीगी सरदारांच्या मतांच्या पालखीत मिरवीत पाकिस्तान आले ते लीगी मुसलमान इथे देशीच राहिले. पण पाक वा खंडित भारत निर्मितीबाबत ज्यांचे मत (वा सार्वमत) घेतले गेले नाही असे हिंदू पाकमध्येच राहिले. त्यांना निवडीचे स्वातंत्र्य नव्हते. आणि पुढील बावीस वर्षात ते उरले नाही. हा मजकूर लिहीत असतानाच रेडियोवर (शासकीय) वार्ता ऐकविण्यात आल्या. त्या वार्ताप्रमाणे १ जानेवारी ते १० जून १९७० पर्यंत पूर्व पाकमधून ७६००० निर्वासित भारतात आले आहेत. पश्चिम पाक 'स्वच्छ' करण्यात आले असून पूर्व पाकही लवकरच 'नष्ट–काफिर' होईल. फॅण्टॅस्टिक नॉन्सेन्स'चे रूपांतर वास्तवात झाले. आणि समस्या कायमची सुटण्यासाठी स्वीकारलेली फाळणी अनेक समस्यांना जन्म देती झाली. लीगी वृत्तीचे मुसलमान इथेच राहिले. काही काळ त्यांनी मान खाली घालून आयुष्य (व काळ) काढली. आणि मग केरळात त्यांचा भाग्य–सूर्य उदयास आला. आजच्या पंतप्रधान व त्यावेळच्या काँग्रेसच्या अध्यक्ष श्रीमती इंदिरा गांधी यांनी 'नंबुद्रिपाद' मंत्रिमंडळ पाडण्यासाठी लीगी काठी हाती घेतली. ती काठी उगारली गेली. मंत्रीमंडळ पराभूत झाले. पण उगारलेल्या काठीतून पुन्हा एकदा भस्मासूर उभा राहिला आहे. त्याला दैवताची प्रतिष्ठा मिळू पहात आहे. पुन्हा एकदा १९४७ पूर्वीची परिभाषा वापरली जाऊ लागली आहे. जातीय दंगे घडवून येथील स्थिर जीवन-स्थिर शासनाला संकटात टाकण्याचा, बदनाम करण्याचा प्रयत्न सुरू झालेला दिसतो आहे. जातीय दंगे हा काही हौसेचा मामला नाही. ती एक राष्ट्रीय आपत्ती आहे. आणि दंग्याच्या लाटेतच एकात्म, एकसंध भारत वाहून गेला. औरंगजेब, चेंगीजखानांना जे जमले नाही ते दंग्यांच्या लाटांवर स्वार होऊन आमच्याकडे चालत आले आहे. ते प्राक्तन स्वीकारून ह्या देशाचा विकास करण्याचा प्रयत्न शासन व जनता करीत आहे. ह्या प्रयत्नात गेली बावीस वर्षे अधुनमधून जातीय उद्रेकांचा अडसर उभा राहतो. असा अडसर उभा राहिला की, ठराविक घोषणा–गर्जना होतात. बंदीची चर्चा होते. युद्ध पातळीवर जातीयवादाशी सामना करण्याच्या, इरेसरीयुक्त घोषणाही होतात. आणि त्यांचा ढोल डिंडिम ऐकून जातीयवाद बहुधा पळून गेला असावा असे वाटते न वाटते तोच दुसरीकडे दंग्याची वार्ता कानी येते. पुन्हा तेच गुऱ्हाळ. चौकशी होते. कोणत्या जमातीच्या, किती गुंडांना (वा गुन्हेगारांना) शिक्षा झाल्या चौकशीत दंगलीची जी कारणे बाहेर आली त्यात मूलभूत, तात्विक संघर्षाच्या स्वरूपाची किती ह्या गोष्टी जनतेला कधीच कळत नाहीत. चव्हाणांच्या खात्याच्या अवहालानुसार तेवीसपैकी बावीस जातीय दंगे मुसलमानांनी सुरू केले असे सिद्ध झाले आहे. तर त्या दंग्यांबाबत कितीशा गुन्हेगारांना शिक्षा झाल्या ? कितपत झाल्या ? मुळातून ज्या व्यक्ति वा जी परिस्थिती कारणीभूत झाली त्याबाबत काही 'कृति' करण्यात आली काय ? नसल्यास का नाही ? देशात जे जे दंगे झाले त्यांत शासनाने कायदा आणि सुव्यवस्थेचे आपले कर्तव्य चोखपणे पार पाडले काय ? दंगे थांबवता आले असते कां ? हे दंगे नेमकं कोण करतं ? हा नुसता दगड मारण्याइतपत सामान्य प्रकार असतो का ? भिवंडीची दंगल तशी होती ? भिवंडीच्या दंगलीबाबत शासनाला पूर्व सूचना मिळाल्या नव्हत्या ? नुसत्या घोषणांनी आणि गुलाल उधळल्याने येवढा विध्वंस 'सहज'गत्या होऊ शकतो ? सापडलेली शस्त्रास्त्रे कोणती कथा सांगतात ? शिवजयंतीबाबत ज्या अटी लावण्याचा प्रयत्न झाला तो स्वतंत्र, सार्वभौम व निधर्मत्वाचा बाणा मिरविणाऱ्या देशांत योग्य वाटतो ? अशाच अटी मशिदी, वाद्ये, कुराण, वायकांचे व छंदावेस्ताबद्दल कुणी घातल्या तर नामदार गृहमंत्री त्याची मलावण करू शकतील ? पाकमध्ये अशा अटी घालता येतात ?









अनुक्रमणिका

तेथल्या शीख धर्मस्थानांच्या स्थितीबाबत अलिकडेच जाऊन आलेल्या शीख यात्रेकरूंनी काय सांगितले ते दिल्लीकरांच्या कानी आले आहे काय ? या देशात अल्पसंख्याकांच्या रक्षणाची जबाबदारी बहुसंख्य जनतेवर आहे असंही म्हटलं जातं. मग बहुसंख्य जनतेच्या जीवित वित्ताच्या संरक्षणाचे दायित्व नेमके कुणावर ? धर्म–धर्माचा विचार न करता साऱ्याच नागरिकांचे संरक्षण करण्याचे दायित्व शासनावर असते असे आपण मानतो. मग शासनाचे संरक्षण लाभले नाही, उशिरा लाभले, अपुरे पडले तरीही बहुसंख्य जनतेने स्वतःच्या संरक्षणासाठीही हात उचलू नये काय ? आघाताला प्रत्याघाताने उत्तर मिळणे हे निंद्य असले तरी कायद्याचे संरक्षण लाभेपर्यंत तरी असे प्रत्याघात तर्कगतच ठरत नाहीत काय ? भिवंडीला जे, ज्या वेगाने, ज्या पद्धतीने घडले ते पाहिले की बहुसंख्यांकांनाच 'हमें बचाओ' म्हणण्याची पाळी तर इथे येणार नाही ना असे वाटून जाते. भिवंडीच्या दंग्यांबाबत न्याय व्हायचा आहे. चौकशीत जे लोक प्रत्यक्षाप्रत्यक्ष दोषी ठरतील ते कोठल्याही जाति–धर्माचे असोत त्यांना विधियुक्त शासन झालेच पाहिजे. ते धैर्य शासन दाखवील असा आम्ही विश्वास बाळगतो.

ह्या जातीय दंग्यांच्या निमित्ताने पुन्हा एकदा 'जातीयवादा'विरुद्ध युद्धाची व त्यासाठी रा. स्व. संघ, जनसंघ, जमात–इ–इस्लाम आदि संस्था–संघटनांना बंदी घालण्याची मागणी करणारी भाषा वापरली जात आहे. दंग्याइतकीच ही भाषा जुनी, परिचित अशीच आहे. मूळ रोग काय ह्याचे निदान करण्याऐवजी 'मलमपट्ट्या' घेऊन धावणाऱ्या 'फर्स्ट-एड'वाल्या वैदूसारख्याच ह्या मागण्या आहेत असे आम्हास वाटते. संघाचे आयुष्य चाळीस वर्षाचे व जनसंघाचे बारा वर्षाचे ! हिंदू–मुसलमान संघर्ष वाईट व निषिद्ध असला तरी कित्येक शतकांचा आहे. तो संघर्ष मानून व तो अटीतटीला आला तेव्हाच तर पंडित–पटेलांनी फाळणीला मान्यता दिली. ती देतांना संघ वा बहुसंख्य हिंदू जनता ह्यांचा कौल कुणी व कधी मागितला होता ? हिंदू मुस्लिम संघर्षाबाबत अधिक स्वच्छ, स्पष्ट व धैर्याची भूमिका घेतली जाणे अगत्याचे होते. पण तशी ती न घेतली गेल्याने व जुन्या खुषीकरणाच्याच तंत्राचा वापर केल्याने मुस्लिम जातीयवाद पुन्हा उभा राहिला आहे. हिंदू जर आक्रमणशील असते तर हिंदु–ख्रिश्चन व हिंदु–पारशी असे दंगे झाले असते. भारतात फक्त हिंदू मुस्लिम दंगेच का होतात ? ते संघ–जनसंघ नसलेल्या काळापासून होत आले आहेत. आणि संघ–जनसंघ नसले तरी होत राहतील. कारण मूळ कारण वेगळे आहे. त्याचे निदान होणे अगत्याचे आहे. त्यासाठी 'समान नागरिकत्व मानून शासनाने सौदेबाजीची वृत्ती सोडली पाहिजे. मुसलमानांना मुसलमान म्हणून जी 'जावई' वागणूक दिली जाते ती देण्याने उलट शासन त्यांना एकात्मतेपासून दूर लोटीत आहे. या देशात जर खरोखरच 'सेक्युलर' राज्य असेल तर 'समान नागरी कायदा' असायला हवा. पण बावीस वर्षानंतर इथे हिंदूंना (बहुसंख्य असल्याचे पाप म्हणून बहुधा) एक कायदा आहे. पण मुसलमानांना मात्र कायदा नाही. एकपत्नीत्वाचे बंधन हिंदूंना आहे. मुसलमान चार लग्ने करू शकतो. त्रिकोणाची धमकावणी हिंदूंना, मुसलमानांना त्रिकोण नाही. आणि तरीही पंतप्रधान म्हणतातच 'जातीय–वादाशी युद्ध पातळीवर लढा'. आम्हासही असेच वाटते. जातीयवादाचा महान शाप अनुभवलेले आम्ही आहोत. १९४७ साली मातेची झालेली विटंबना आम्ही विसरू शकत नाही. पंतप्रधानांच्या ह्या युद्धजन्य चळवळीबद्दल काही पथ्यपाणी सुचवावेसे वाटते. जातीयवाद जायचाच असला तर सर्व क्षेत्रातून त्याला 'चलेजाव' म्हणून बजावले पाहिजे. ह्याबाबत पंतप्रधानांची भावना व गृहमंत्र्यांची इच्छा प्रामाणिक असून 'डबलगेम'चा त्यांनाही कंटाळा आला असावा असे आम्ही गृहित धरतो. आता हे पथ्यपाणी—

(१) सर्वंच देशासाठी समान नागरी कायदा करा.

(२) मुस्लिम शाळा व विद्यापीठे ह्यांचे स्वतंत्र अस्तित्व रद्दबातल करणे. त्यातून सर्वांना प्रवेश मिळावेत. ख्रिश्चन पारशी कॉलिजातून असे प्रवेश मिळतात.

(३) धर्मस्थानांचा वापर जर शस्त्रास्त्रांसाठी केला गेला तर तो अवैध ठरविणे.

(४) 'जातीय' विचार महत्वाचा मानून मंत्रिमंडळे, विधानसभा–लोकसभा व शासकीय कार्यालये यात होणाऱ्या निवडी–नेमणुकांची पद्धत बंद करणे.

(५) 'जाती'चा विचार करून त्या त्या विभागातून उमेदवार उभे न करणे.

(६) धार्मिक वा जातीय गुंडगिरीला संरक्षण न देता कडक शासन. त्यात निवडणुकीचे सौदे आड येऊ नयेत.

(७) शासनाने वा शासकीय पक्षाने कुठल्याही निवडणुकीत कुठल्याही जातीपातीचा विचार करणे सोडून द्यावे. सर्वत्र राजकीय पक्षांनी हे धोरण पाळण्याची गरज आहे. आज बावीस वर्षांनी आम्ही नुसतेच जातीय राहिलो नाही तर कडवे उप(वा पोट) जातीय बनलो आहोत. त्यामुळेच तिकीट, मंत्रिपद, मान, पैसा वगैरे मिळतं हे ठाऊक झाल्याने जातीयतेला वजन आले आहे. सैन्यात जशी गुणवत्ता हवी तसेच इथेही तीच पाहिली जावी.

(८) 'जातीय' संस्थांना सरकारी अनुदाने, द्रव्य देण्यात येऊ नये.

(९) सर्व नागरिकांचे संरक्षण करण्याचे दायित्व शासनाने पाळावे.

(१०) 'जातीयवाद' नेमके काय ते स्पष्ट करावे व ते कायद्यात नमूद करावे.

"जातीयवाद मुर्दाबाद !" भारत अमर रहे !!

—सारस्वत









(पान ६० वरून)

रहातो. अर्थातच अशा या निर्मितीत कादंबरीचे मूळ स्वरूप तंत्राच्या व आविष्काराच्या दृष्टीने आपली चाकोरी बदलते; असा बदल मोठा अवघड असतो व तो बदल करण्याचे कुवत पेलण्याचे सामर्थ्य असलेली लेखणीच या लेखनप्रयोगात यशस्वी ठरते. पेंढारकरांनी ते यश लाभलेले आहे.

अशा तऱ्हेच्या या एकाच वर्षात व एकाच प्रकाशकाकडून प्रकाशित झालेल्या चार मराठी कादंबरीका! कादंबरीकांचा वा लघुकादंबरीचा लेखनप्रकार दिवसेंदिवस मराठीत अत्यंत लोकप्रिय होत चाललेला दिसत आहे. 'दीपावली'ने तर वर्षभर कादंबरींना दर अंकातून कादंबरीका देऊन वाचकांबरोबरच चोखंदळ समीक्षकांनीही या कलाकृतीच्या सामर्थ्याचा व मर्यादांचा विचार करावयास भाग पाडले आहे. या चारही कलाकृती, प्रारंभीच म्हटल्याप्रमाणे, जीवनानुभवांची चार वेगवेगळी दर्शने देतात पण तंत्राच्या व निवेदनाच्या दृष्टीने एकसुरीच वाटतात. म्हणूनच या सर्व कादंबरीका एका अर्थाने मराठीतील आजच्या कादंबरीकाँ लेखनाचे सामर्थ्य जसे प्रकट करतात, तशाच मर्यादाही ठळकपणे दाखवितात.

— प्र. श्री. नेरुरकर

| | |
|---|---|
| प्रतिष्ठा | अनंत मनोहर |
| काळोख आणि किरण | ल. ग. जोग |
| वावर | प्र. ना. शेणई |
| प्रतीक्षा | : प्रभाकर पेंढारकर |

प्रकाशक सौ. मालती माटे, विश्वकर्मा साहित्यालय, ३९५, टिळक पथ, पुणे–९

(पान १० वरून क्षुद्रघंटिका)

त्यांच्या दुसऱ्या मुक्कामाच्या वेळी माझ्या पत्नीने कॉलीफ्लॉवरची अत्यंत चवदार अशी भजी डॉक्टर साहेबांच्यासाठी तयार केली. त्या दिवशी मातोश्री लक्ष्मीबाई टिळक आमच्याकडे होत्या. भज्यांच्या वशा पुढयात आल्या. आम्ही विशेषतः डॉक्टरसाहेब मोठ्या आवडीने भजी खात होते, तोंड भरून बोलत होते. बोलता बोलता वशी संपली, दुसरी आली. "डॉक्टर! तुम्हाला भजी फार आवडलेली दिसतात. बाधणार तर नाहीत ना?" तब्येतीच्या दृष्टीने सहजपणे मी बोलून गेलो. तसे डॉक्टरसाहेब मिटक्या मारीत म्हणाले — "बाधायला काय झालं, तशी हलकी असतात." "भजी आणि हलकी?" हे आश्चर्य मी व्यक्त करताच टिळक आई मला म्हणाल्या "अरे सोपानदेव! डॉक्टरसाहेब म्हणतात ते अगदी खरं आहे. (डॉक्टर चमकले) हे पहा सर्वात हलकं काय असतं ते सांग." पचण्याच्या दृष्टीने मी म्हणालो "पाणी", "बरोबर, आणि पाण्यापेक्षा हलकं काय असतं?" पाण्यापेक्षा हलके काय असणार! मी गोंधळात पडलो त्यावर त्या म्हणाल्या, "अरे पाण्यापेक्षा हलकं म्हणजे तेल! ते पाण्यावर तरंगतं आणि तेलापेक्षाही हलकी भजी! ती तेलावर तरंगतात. सर्वात हलकी भजी! लक्ष्मीबाई टिळकांचा हा अजब शोध ऐकून आमच्या बरोबरच डॉक्टरसाहेब खदखदून हसले आणि उभे राहून म्हणाले, "लक्ष्मीबाई! हे ज्ञान काही माझ्या ज्ञानकोशात येऊ शकले नाही." एका साहित्यिकाने दुसऱ्या साहित्यिकाच्या विनोदाला इतकी दिलखुलास दाद देणे कठीणच! डॉक्टरसाहेबांची खेळाडू वृत्ती त्यात दिसून आली.

डॉक्टरसाहेबांनी आम्हां उभयता पतिपत्नीला त्यांच्या घरी पुण्याला यायचे निमंत्रण दिले. पुढे तसा योगही घडून आला. गोळीबार मैदानासमोरील त्यांच्या बैठ्या बंगल्यात आम्ही पाहुणे म्हणून मुक्कामाला आलो. परंतु त्यात त्यांनी पाहुणेपण नाहीसे करून घरचे बनविले. त्यांच्या आतिथ्यशील पत्नी शीलवतीबाई, मानस पुत्र दामोदर आणि मानस कन्या वीरा यांच्या समवेत दोन दिवस फार आनंदात गेले. डॉक्टरांना फुलांचे वेड होते. त्यांच्या बागेतील वैशिष्टयपूर्ण फुले त्यांनी आम्हाला दाखविली. त्यात एक पाखराच्या आकाराचे फूल होते फुलांच्या वासातला सहवास!

छत्री विसरणे, एखादे वेळी बूट घालायला विसरणे या गोष्टी त्यांच्या अंगवळणी पडल्या होत्या. डॉक्टरसाहेब वस्तू विसरत असत, परंतु वस्तुस्थितीचा मात्र त्यांना कधीच विसर पडला नाही. ते नियमितपणे आपल्या कामासाठी घराबाहेर पडायचे. पुण्याच्या रस्त्यारस्त्याना ते माहीत होते. आता मी पुण्याला गेलो म्हणजे एखादे वेळी एरंडवनातील एका लहानशा रस्त्याने जातो त्या रस्त्याला 'ज्ञानकोशकार डॉ. केतकर मार्ग' असे नाव दिलेले आहे. एवढे का होईना पुणेकरांनी त्यांचे स्मारक केले आहे. हेही नसे थोडके! —

* * *

[पुढील क्षुद्रघंटिका—प्रबोधनकार आणि सतार]






REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-paymet JULY 1970

DIPAVALI MONTHLY

# वा... काय चमक आहे!...
# ह्या सर्वोत्तम शुभ्रतेचे कारण टिनोपाल



प्रत्यक्ष खात्री करून घ्या. कपडे धुवून झाल्यावर शेवटी पाण्यातून काढताना थोडेसे टिनोपाल घाला आणि पहा ते कसे अगदी लख्ख निघतात ते! याला म्हणतात टिनोपालचा शुभ्रपणा! तुमचे सदरे, साड्या, चादरी, टुवाल... अगदी सर्व कपड्यांवर टिनोपालची झळाळी दिसल्याशिवाय रहाणार नाही!
अन् या साऱ्याला असा कितीसा खर्च येतो? प्रत्येक कपड्यामागे एका पैशाहून कमीच! आजच टिनोपाल खरेदी करा. रेग्युलर... इकॉनमी... किंवा पॅकेट-फॉर-ए-बकेट् अशा तीन आकारात ते मिळते.







®टिनोपाल हा जे. आर. गायगी एस. ए., बाल, स्वित्झर्लंड यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे.

सुहृद गायगी लि., पो. ऑ. बॉक्स नं १०५०, मुंबई २० बीआर.

Shilpi HPMA 7A/70 Mar

Cover Printed At Asha Printery, Bombay-4.

अनुक्रमणिका